

नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

# दीपावली

वेस्ट इंडीज
स्वागत
क्रिकेट पुरवणी

वर्ष २२ वें * डिसेंबर '६६
मूल्य १ रु.

अनुक्रमणिका

## क्रिकेट शौकिनांसाठी खास पुरवणी





# दीपावली

साहित्य-कला-संगम

डिसेंबर १९६६ वर्ष २२ वे

मुल्य १ रुपया

## श्रे य ना मा व लि–

**कथा :** तुझं सुख ते माझं सुख–वि. वा. पत्की ● प्राक्तन–अरविंद ताटके ● मी आणि संगीत –वि. रा. भाटकर

**लेख :** बेताल मी, बेधुंद मी–(एरॉल फ्लीन)–प्रभाकर अत्रे आणि अंदमान ते आनंदमान–माधव राजवाडे

☆ शिवाय ☆

### खास क्रिकेट पुरवणी

इंग्लंडचं ब्रह्मचर्य गेलं, पण गाढव राहिलं...सिरीजचा शिल्पकार सोबर्सच–अरविंद ताटके ● भारत-वेस्ट इंडीज कसोटी सामन्यांचा चित्तथरारक इतिहास–प्रा. सुरेश गजेंद्रगडकर ● क्रिकेट–वेडा भारत–दि. श्री. कराडकर ● क्रिकेट समितीला रोखठोक सवाल करणारी नरी कॉन्ट्रॅक्टरची खास मुलाखत–प्रा. अविनाश केळकर ● क्रिकेटमध्ये हेहि घडतं–गंमत्या

: शिवाय :

असे पाहिले, असे ऐकले—बन्याबापू, सन्मानपुष्पे—आदित्य, दीपमाला—सारस्वत आणि हास्यस्फोटक व्यंगचित्रे, वात्रटिका, क्षणशृंगारिका.

**दलाल आर्ट स्टूडिओ. ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४**

Gram : Dalalart
टे. नं. ३५७७६५

● संपादक-मुद्रक-प्रकाशक-मालक श्री. दीनानाथ दलाल, दलाल आर्ट स्टुडिओ, ४०–४२, केनेडी ब्रीज, मुंबई ४. या प्रतीस किंमत १ रु. + रजि. पोस्ट ५५ पैसे. वार्षिक वर्गणी, दिवाळी अंकास रु. १२॥. अंकांत प्रसिद्ध झालेलीं मतें ही चालकांचींहि अधिकृत मतें असतातच असें नाहीं प्रकाशित चित्रें व लेख यावरील सर्व हक्क दलाल आर्ट स्टुडिओच्या स्वाधीन आहेत.
Registered with the Registrar of Newspapers For India under No. RN 1612/57
DIPAVALI : Dalal Art Studio, 40-42, Kennedy Bridge, Bombay -4

अनुक्रमणिका




## दलाल आर्ट स्टुडिओ

४२, केनेडी ब्रीज, मुंबई, ४,
टेलिफोन : ३५७७६५ ★ तारेचा पत्ता, DALALART

● **वर्गणीदारास सूचना :** दीपावली व सर्व खास अंकांसह दीपावलीची वार्षिक वर्गणी रु. १२–५० पैसे. द्वैवार्षिक वर्गणी रु. २०; त्रैवार्षिक वर्गणी रु.२५ व चार वर्षांची वर्गणी रु. ३२. **परदेशीं वार्षिक वर्गणी १६–००**

● **वर्गणी** मनिऑर्डरनें द्यावी. चेक पाठविल्यास तो दलाल आर्ट स्टुडिओच्या नांवें, मुंबई बँकेवरचा असावा. इतर ठिकाणच्या बँकेवरचा असल्यास ७५ पैसे वटणावळ जादा पाठवावी. कोणत्याहि महिन्यापासून वर्गणीदार होता येतें.

● **अंक न पोचल्याचें** कळवावयाचें झाल्यास ५ तारखेपर्यंत वाट पाहून मग कळवावें. अंक ऑफिसमध्यें शिल्लक असल्यास जरूर पाठविला जाईल.

● **जाहिरातींचा व्यवहार** हा परस्पर विश्वासाचा असतो. गिऱ्हाईकांच्या इच्छेनुसार जाहिरात छापण्याची कोशिस करण्यांत येते. तरीहि तांत्रिक अडचणीमुळें अगर अन्य कारणामुळें जाहिरातींत कमी–जास्त फरक झाला तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकावर नाहीं.

● **साहित्याच्या स्वीकृतीचा** निर्णय महिन्याभरांत सामान्यतः कळविला जातो. पोस्टेज असलेलें नापसंत साहित्य परत पाठविलें जातें. पुरेसे पोस्टेज नसल्यास तें निकालांत काढलें जाईल.

● **स्वीकृत अगर इतर साहित्य** गहाळ झालें तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकावर नाहीं.

संपादक, मालक, मुद्रक व प्रकाशक श्री. **दीनानाथ दलाल** यांनीं स्टेट्स पीपल प्रेस, जन्मभूमि भवन, घोगा स्ट्रीट, फोर्ट, मुंबई १ येथें छापून, दलाल आर्ट स्टूडिओ, ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४ येथें प्रसिद्ध केलें.


# दिवाळीनंतर....

दिवाळी आली. गेली. तशी विघ्नं न येता पार पडली. आता काही प्रांतात दुष्काळाची छाया पडली आहे. विद्यार्थी आंदोलने चालू आहेत. गोळीबार चालू आहेत. आंधामध्ये आंध निर्मितीनंतर प्रथमच प्रचंड प्रक्षोभ उसळला आहे. दिल्लीतही गाईच्या निमित्ताने काही असुरी शक्ति थैमान घालून गेल्या आहेत. ह्या साऱ्यांचे व्रण अजून उरात आहेत. पण येवढ्या मोठ्या खंडप्राय देशात असे काही तरी सतत घडत राहणारच. त्याच्या खंती उरी बाळगून का होइना जीवनातले दसरा-दिवाळीसारखे सण माणसे साजरा करीत आलेतच आहेत. करीत राहतीलच. कारण उत्सवानेच माणसाना येतो उत्साह. तो एकटा राहत नाही. मोठा होतो. बहुत होतो. बहुतांचा होतो. येणारा प्रत्येक सण त्याच्या जीवनात पेरतो नव्या प्रेरणा. देऊन जातो नवे चैतन्य. त्या चैतन्याचा आणि प्रेरणांचा वारसा घेऊनच तो करतो वाटचाल – संकटातून, काटचाकुटचातून, जीवघेण्या उदासीनतेतून, वाऱ्यावादळातून आणि दुष्काळातूनही!

दिवाळी म्हणूनच उत्साहाने पार पडली. दिवाळी अंक निघाले. घरोघरी गेले. नेहमीप्रमाणे "यंदाचे अंक काही खरे नाही बरं का" "एकंदर स्टँडर्ड कमी कमी होत चाललंय," "दिवाळी अंक म्हणजे अक्षरशः लूटमार" वगैरे अभिप्राय ऐकायला मिळाले. क्वचितच एकाद दुसऱ्या अंकाबद्दल, चित्रांबद्दल–कथा कादंबरीबद्दल लोक बरंही बोलताना दिसले. पण दिवाळी आली की, लोक अंक काढणार आहेत. त्याची खरी (खोटी) जाहिरात करणार आहेत. लोक घेणार आहेत. दरवर्षी 'स्टॅंडर्ड'ची तक्रार करीत करीत ते वाचणार आहेत. पुन्हा पुढली दिवाळी येईपर्यंत त्यासंबंधी अधुन मधून ओरडणार आहेत. कारण उत्सव ही आमची 'प्रकृति' आहे. इतक्या प्रतिकूलतेतही ती 'प्रकृति' टिकून राहिली आहे. राहणारच आहे.

'स्टँडर्ड' नेहमीच कालच्यापेक्षा आज घसरलेलंच असतं (असा समज-गैरसमज) शिक्षण, चित्रपट, नाटक, चित्रकला, नृत्य संगीत साहित्यादि सर्वच बाबतीत नेहमी कालच्या 'स्टॅंडर्ड'चा वायदा केला जातो. तरी साहित्यादि सर्व कला काही नवी नवी रूपे–विस्मित करणारी रूपे घेत आल्या आहेतच. क्रिकेटच्या सीझनची आता सुरुवात झाली आहे. छोटे मोटे सामने चालू झाले आहेत. काही होतील. पण पुन्हा हीच 'स्टॅंडर्ड'ची चर्चा होईल. आणि ती चर्चा ऐकत (वा तिचे "सनातन रूप" ध्यानी घेऊन) माणसे निरनिराळ्या स्टेडियमवर गर्दी करतील. खेळात रंगतील. बेहोष होतील. रेडियोला उसंत मिळणार नाही. कारण ह्या कला आणि क्रीडातून खचलेल्या, पिचलेल्या, संकटानी घेरलेल्या माणसाना मिळते प्रेरणा जगण्याची–हंसत खेळत, जीवनाचा आनंद उपभोगीत खेळत-रमत जगण्याची!

क्रिकेटचे सामने येतील आणि संपतीलही. क्रिकेटबद्दलची आपुलकी आता इथे स्थिरावली आहे. आमच्या जीवनाचाच ती एक भाग बनली आहे. दिवाळीनंतर आता आले आहे क्रिकेट! तुम्हा आम्हाला नवा आनंद देण्यासाठी. 'स्टॅंडर्ड' नाही म्हणत म्हणतच आपण पतौडीचा षट्कार पाहणार आहोत. चंदू बोर्डे, बापू नाडकर्णी, जयसिंह ही नावे खेळणार आहेत आपल्या जिभेवर! कारण उत्साहाचे असे डोस हीच तर आपली खरी जीवनशक्ति! जीवनप्रेरणा!!

म्हणून तर दिवाळीनंतर उत्साहाने निघतो आहे हा दीपावलीचा अंक–आपल्या 'प्रयोगशील' व 'कल्पक' क्रिकेट पुरवणीसह!!

पण ह्या 'नॉन-स्टॉप' बॅटिंगची खरी प्रेरणा आहात–तुम्ही रसिक-कला-क्रीडा-प्रेमी वाचक! 'स्टँडर्ड राहिलं नाही हो!' म्हणून म्हणतच तुम्ही स्टेडियमवर 'हीऽऽऽ' गर्दी करणार आहात आणि 'दीपावली'चा हा अंकही उड्या टाकून वाचणार आहात. (स्टँडर्ड आहे म्हणत).

–संपादक










**प्रतिवर्षाप्रमाणे 'दीपावली' दिवाळी अंकावर वाचकांची शेकडो स्तुतिपर, काही सुचनेवजा अशी अभिनंदनाची पत्रे आली—त्यातल्या एका पत्राने लक्ष वेधून घेतले. तेव्हा नेहमीप्रमाणे अनेक पत्रे या सदरात प्रसिद्ध करण्याऐवजी तेच एक बोलके पत्र प्रसिद्ध करीत आहोत. मुद्दाम पत्राने अभिप्राय कळविणाऱ्या सर्व रसिक वाचकांना धन्यवाद !**

## सर्वांगसुंदर अंक !

स. न. वि. वि.

प्रस्तुत पत्र पाहून आपल्याला प्रश्न पडेल कीं 'हा कोण वरं उपरा?' तथापि अस म्हटलं जातं कि 'जिस मैफलमें दीदावर है नहि तो मैफल क्या चीज !' तसंच हे आहे. आपल्या 'दीपावली'चा अंक विकत घेतला आणि मनाला जो अननूभुत आनंद झाला तो आपल्याला कळविल्यावांचून राहवेना. मन म्हणालं त्याना राग येवो, लोभ वाटो, रसिकानं आपली दाद कळवली पाहिजेच.

रसिक मनाच्या अन्तरंगाला विविध रंगाच्या नाजुक-नाजुक छटानी कमालीचं मुदित करण्याचं सामर्थ्य आपल्या कुंचल्यात आहे. अंक वाचताना सारखी ज्ञानोबाची ओवी ओठावर यायची—

'सूर्ये अधिष्ठिली प्राची ।
जगा राजीव हे प्रकाशाची ।
तैशी भाषा ज्ञानाची ।
श्रोतयां दिवाळी करी ।

आणि मग त्या सुदर्शनानं ओलावून, त्या रंगशलाकानी वेडावून, त्या सुमधुर गद्य-पीयूषाचे आकंठपान करून मन स्वतःशी ज्ञानोबांचा मागोवा घेत कुजबुजायचं—

ही गद्यकाव्याची रुपावली ।
आणि चित्रांची रंगावली,
लेवून ज्ञानाची दीपमाळी ।
सजली 'दीपावली'
ऐसा कलांचा संगमु ।
किं गगनी प्रकाशे चन्द्रमु ।
हा उषेचा लालिमु । होऊन ठेला ।

'वा! सुरेख! शोभनम् अतीव शोभनम्!' याशिवाय पहिलं उद्गारवाचक वाक्य ओठातून निघत नाही. आणि माझ्या समजुतीप्रमाणं इथंच आपल्या संपादन-कौशल्याला 'दाद' मिळून जाते. 'बहुत खूब' !!

आणि म्हणून या उद्गाराला शब्दरूप करण्याचा हा तोकडा तथापि प्रामाणिक प्रयत्न!

आपली पहिली चित्रनायिका 'प्रणयिनी' जणु कामशरानी प्रियाला नाजूक टोचते आणि जशी चक्रवाकी व्यथा प्यायला आतुरते आपल्या चोचीनी, तशी ही मुग्धा, मुग्ध चमूला साक्षीला ठेवून, साक्षित्वाने सुख, दुःख, आशा निराशा, अभिलाषा, तृषा, सारं सारं पिऊन टाकण्यासाठी आसुसली आहे. 'पुन्हा न येईल वेळ' असे ते स्वप्नाळू डोळे त्या अनोख्या स्वप्नाला जणु सांगत आहेत. जियं शब्दांचा स्पर्श असतो नाजूक, मोर पिसासारखा ! श्वासच निश्वास टाकत असतात सारखा!

अद्वैताचा अनुभव करतो तनुच्या जाणीवेला पारखा ।
असा मामला धुंद असतो अवघा !'

आणि मग 'मनस्विनी'वर लोचने स्थिरावतात. मानसीच्या अपूर्व सुख-सागरात पोहत असलेल्या तिच्या चित्त-कमलाच्या पाकळ्या नुकत्याच त्या पाण्यातून वर येऊन त्यानी हिच्या अतीव सुंदर नयनाना झापडी लावली असावी असं वाटतं हिच्या मिटलेल्या पापण्या पाहून.

दिव्यरसी विरणे जीव ।
जीवित हे त्याचे नाव ।

ही बालकवींची कल्पना हिच्या रूपाने सुमूर्त झाली आहे. ही मनभाविनी आता स्वतः तरी कुठं भानावर आहे?

ही एक स्त्री ! नच ही मुग्ध एक अभिलाषा ।
करुनिया करांच्या पाशा ।
माळुनि भवति भरली आशा ।
बांधीते अद्वैत आपुल्या कुशि ।

असं ओठ पुटपुटायला लागतात. प्रियाच्या वक्षावर विसावलेल्या क्षणी ही त्या मांगल्य मंडपातली शुचिर्भूत नोवरी, आत्मसमर्पणाच्या एकाच भावनेत हरवून गेली आहे. नादब्रह्माची ही धून, तालांची ही धुंद लय, नादाशिवाय वाजते आहे. लयी—शिवाय नाचते आहे.

आणि ही कोण, व्याकुळ रमणी, आश्रमहरिणी किं शीतल सौदामिनी! ही ! 'कामायनी' हिचिया संगे कामहि व्याकुल लागला चरणी । विजयिनी ही तरिही. आकुला ही कामिनी । हो ! अहो हे असेच घडते. शुद्धबुध हरते, शिव बसतो जिवकोंदणी । ही कामाची करणी ।

या चित्रातला रंगाचा सुमधुर मिलाफ, मन मोहून टाकतो. कामार्त अशी ही नवयौवना! "हे तारुण्याचं ओझं कसं

[ पृष्ठ ५२ वर पहा ]

---








# तुझं सुख ते माझं सुख!

—वि. वा. पत्की

**अलकानं** 'नाझ'ला लागलेल्या चित्रपटाची तिकिटं काढून आणली म्हणून माई चित्रपट पाहायला गेल्या खऱ्या, पण त्यांचं चित्रपटाकडे लक्षच नव्हतं. चित्रपटात हास्याचे प्रसंग आले, कीं प्रेक्षक सारं थिएटर डोक्यावर घेत होते, खदखदून हसत होते, पण माई गप्प बसून सारं पाहात होत्या. चित्रपटातल्या विनोदात त्यांना गोडी वाटत नव्हती. अलकाच्या हे लक्षात आलं तशी ती मनात म्हणाली, 'या आईला झालंय् तरी काय? . . .'

अलकाला असं वाटावं अशा तऱ्हेनं माई अलीकडे खरोखरच वागत होत्या. अलकानं काही केलं तरी ते त्यांच्या मनाला येईनासं झालं होतं. वास्तविक ती त्यांची एकुलती एक लाडकी लेक. पतीच्या अकाली झालेल्या निधनानंतर तळहातावरील फोडासारख्या त्या तिला जपत होत्या. तिचं सारं कोडकौतुक त्यांनी केलं होतं. तिच्या साऱ्या हौशी त्यांनी पुरविल्या होत्या. सुदैवानं कशाची ददात नव्हती. रघुनाथरावांचं तडकाफडकी निधन झालं खरं, पण वयाची चाळीशी येण्यापूर्वीच त्यांनी स्वतःच्या मालकीचं थिएटर उभं केलं होतं. महिन्याला हजार दीड हजार रुपये निर्वेधपणे येतील अशी सोय त्यांनी केली होती.

पति निधनाचं दुःख माई विसरल्या त्या क्षणाक्षणानं अलकाच्या रूपानं वंशवेल वाढत होती या समाधानात. अलकाच्या जन्मानंतर तीन चार वर्षं गेली तरी त्यांना पुन्हा दिवस गेले नाहीत आणि एके दिवशी हृदयविकाराने पतीची जीवनज्योत मालवली तसा पुत्रप्राप्तीचा संभवच उरला नव्हता. 'नसे ना मुलगा नसला तर, माझ्या अलकालाच मी मनासारखी वाढवीन, शिकवीन. मुलगा नसला म्हणून जन्मभर रडत बसणं हा कसला वेडेपणा? स्वतःच्या म्हातारपणी आधारासाठी मुलगा हवा खरा, पण तो नाही म्हणून काय सारा जन्म त्याचा ध्यास लावून घ्यायचा? जे मिळणंच शक्य नाही ते मिळत नाही म्हणून दुःखीकष्टी होण्यात काही अर्थ नाही!' असा विवेक त्यांनी आपल्या मनाला शिकविला होता.

अलका वाढू लागली, शाळेत जाऊ लागली, नव्या नव्या वस्तूंसाठी आणि तऱ्हेतऱ्हेच्या फ्रॉकांसाठी हट्ट धरू लागली. तसे तिचे सारे हट्ट पुरविण्यात त्यांच्या मनाला एक नवाच आनंद वाटू लागला. 'मला कामतांच्या नीलिमासारखा फुलाफुलांचा फ्रॉक हवा' किंवा 'निमकरांच्या पप्पूसारखी चकचकीत बॅग उद्या आणायचीच हं आई' असं अलकानं म्हणावं आणि माईंनी तिच्या मनाजोग्या



अनुक्रमणिका

सगळ्या वस्तू आणून द्याव्या, असं नेहमी झालं होतं. . . . 'मुलखाची हट्टी आहेस तू!' असं त्या दर खेपेला म्हणाल्या होत्या खऱ्या, पण त्यात रागापेक्षा कौतुकाचाच भाग अधिक असे. . . .

पण शाळेतलं शिक्षण आटोपून ती कॉलेजात जाऊ लागली त्याचं एकीकडे त्यांच्या मनाला कौतुक वाटू लागलं, तर तिचं वागणं त्यांच्या मनाला येईनासं झालं. कॉलेजातल्या मुला-मुलींची ट्रीप दक्षिण भारतातली स्थळं पाहाण्यासाठी गेली तेव्हा माईंची प्रकृति बरी नव्हती. अलकानं या ट्रिपमधून जाऊ नये असं त्याना वाटत होतं, त्यानी तसं सुचवून पाहिलं होतं, पण अलकानं त्यांचं ऐकलं नव्हतं. ती ट्रिपला गेली होती. . .

ती दर वेळेलाच अशी वागू लागली, तशा माई अस्वस्थ होऊ लागल्या. तिला कसं सांगावं हे त्याना समजेनासं झालं. त्या गांगरल्या. पण त्याना एक युक्ति सुचली. बापूसाहेब सरदेसायांचे आणि त्यांचे व्यावहारिक संबंध आता उरले नव्हते, तरी स्नेहाचे संबंध कायम होते. आता त्यांच्या एकट्याच्या मालकीचं झालेलं 'अलका' थिएटर रघुनाथरावांच्या आणि बापूसाहेबांच्या भागीत होतं तेव्हा त्यांचं एकमेकांकडे जेवढं जाणं-येणं होतं तेवढं आता उरलं नव्हतं हे खरं, पण संसारातल्या चार गोष्टी मोकळेपणानं बोलायच्या झाल्या तर त्या बापूसाहेबांच्या जवळ बोलाव्या आणि बापूसाहेबानी आलेल्या अडचणीतून मार्ग काढावा हा गेल्या पंधरा वर्षांतील त्यांचा अनुभव होता.

अलकाचं सारं वागणं आपल्या आटोक्याबाहेर चाललं आहे असं माईंना वाटलं तशा त्या बापूसाहेबाना म्हणाल्या,

"तुम्ही तरी सांगून पाहा तिला. . . तुमचं ऐकेल ती! . ."

"माझं?", . .

"हो. . ."

"मी सांगून पाहीन, पण मुलं कुणाचंहि न ऐकण्याच्या अवस्थेत येतात ना, त्या अवस्थेत ती आता आहे!". . .

"आणि हे कुणी सांगितलं तुम्हाला? . . ."

"सांगायला नको मला कुणी. मीच पहातोय् ना माझ्या डोळ्यानी गाण्याच्या क्लासला जाण्याऐवजी तू अभ्यासाकडे अधिक लक्ष दे, पहिला वर्ग मिळव असं तुम्ही तिला दहा वेळा तरी सांगितल्याचं तुम्हीच सांगता. ऐकलं तिनं तुमचं? कुणाचं ऐकायचंच नाही अशी मानसिक अवस्थेत मुलं जेव्हा असतात तेव्हा त्यांच्या कलानं त्याना जाऊ देण्यातच शहाणपण असतं! . . ."

बापूसाहेबच असं म्हणू लागले तेव्हा माई अधिकच गांगरल्या. काय करावं हे त्याना कळेना. 'या पोरीचं पुढे होणार तरी कसं?' या विचारानं रात्रंदिवस त्यांचं मन पोखरू लागलं. बापूसाहेबानी नेहमीसारखं यावं, माईंनी पुढ्यात आणून ठेवलेल्या ट्रेमधल्या खाद्यपेयांचा आस्वाद घेता घेता माईंनी 'तो विषय काढला तरी युक्तीनं तो टाळावा असं होऊं लागलं. पण माई अगदी घायकुतीला येऊन जेव्हा 'नशिबात असेल ते काही चुकायचं नाही' असं म्हणू लागल्या तसे बापूसाहेब म्हणाले,

"असा तुम्ही स्वतःला त्रास करून घेण्यात काही अर्थ नाही. तिचं तिलाच जेव्हा आपलं हित समजू लागेल तेव्हा तिला काही सांगावंच लागणार नाही."

माईंनी हा विषय काढावा आणि बापूसाहेबानी असं काही तरी उत्तर द्यावं असं होऊ लागलं, तेव्हा एक नवा उपाय त्याना सुचला. त्या म्हणाल्या,

"ती आता माझं ऐकत नाही, तुमचंहि ऐकणार नाही असं म्हणता. पण ती कुणाचं ऐकेल मला ठाऊक आहे!."

"कुणाचं ऐकेल म्हणता? दिनकरचं? . . ."

माई संमतिदर्शक हसल्या होत्या. आपल्या मनातला विचार बापूसाहेबानी ओळखला म्हणूनच नव्हे, तर त्याचा उच्चारहि त्यानी केला म्हणून. दिनकर बापूसाहेबांचा भाचा होता. शिक्षणासाठी त्यांच्या घरी येऊन राहिला होता. काही तरी निमित्तानं दोन वर्षांपूर्वी एकदा तो माईंच्याकडे आला तेव्हा तरतरीत नाकाचा, गोरापान, उंचेला दिनकर त्याना इतका आवडला होता की त्यांच्या मनात विचार आला होता तो हा कीं अलकाला हा किती शोभून दिसेल! . . . कित्येक दिवस हा विचार त्यांच्या मनात रेंगाळत होता, पण अलकाजवळ हा विषय काढण्याची, कां कुणास ठाऊक, त्याना भीति वाटत होती. आपण काहीहि सांगावं आणि ते तिच्या मनाला येऊ नये, असा प्रकार आताशा नेहमी होऊ लागला होता, म्हणूनच त्या मनाशी म्हणाल्या होत्या, आताच हा विषय काढण्यात अर्थ नाही. पण या विचारानं त्यांच्या मनाचं समाधान होत नसे. असला मुलगा हातचा घालवला तर पुढे पस्तावण्याची वेळ येईल असं त्याना सारखं वाटत होतं. मात्र त्यानी हा विषय एकदा मोठ्या खुबीनं बापूसाहेबांच्या जवळ काढला होता आणि त्यांच्या मनाचा अंदाज घेतला होता. 'गंगूला सहा मुलगे असले, तरी आपल्या मुलानं घरजावई झालेलं तिला आवडेलसं मला नाही वाटत, माई!' असं बापूसाहेब म्हणाले तशा त्या म्हणाल्या होत्या, 'मीच विचारीन गंगूताईंना आता आल्या म्हणजे!' त्यानी संधि साधून खरोखरच विचारलं होतं आणि गंगूताई नुसत्या हंसल्या होत्या तेव्हा त्यांच्या हंसण्याचा योग्य तोच अर्थ माईंनी लावला होता. आज नाही उद्या दिनकर आपला जावई होणार, इथंच राहाणार, साऱ्या इस्टेटीची व्यवस्था पाहाणार अशी सुखस्वप्ने त्यांच्या दृष्टीपुढे तरळली होती. . .

दिनकरनं अंदाजानं साऱ्या गोष्टी ओळखल्या होत्या, पण त्याहिपेक्षा अलका त्याला आवडली होती. निरनिराळ्या कलांची आवड असणारी, मुग्धपणे हसणारी, कमनीय बांध्याची, फुलपांखरासारखी बागडणारी अलका त्याला हवीशी वाटली होती. त्याच्या बोलण्या-चालण्यातून, त्याच्या दृष्टीतून त्याच्या मनातली सुप्त इच्छा प्रगट झाली तशा माई सुखावल्या होत्या. काहीतरी निमित्तानं अलकाचा आणि त्याचा सहवास वाढेल अशा धोरणानं त्या वागू लागल्या होत्या. आपल्या मनातली ही








इच्छा ओळखून अलकाहि वागते हे पाहून त्यांचं मन हर्षभरित झालं होतं.

मात्र ही गोष्ट उघडपणे बोलावी असं त्याना वाटत नव्हतं. 'माझ्या लग्नाची एवढी घाई कसली झालीय तुला आई?' असं ती म्हणणार हे त्याना माहीत होतं. ते खरंहि होतं. पण दिनकर-बरोबर लग्न करायला तिनं संमति दिली कीं त्यांचं मन निश्चित होणार होतं. आपल्या अलकाला चांगला नवरा मिळाला म्हणूनच नव्हे, घरात राहाणारा, सारं सांभाळणारा घरजावई मिळाला म्हणून!

पण वर्ष सहा महिने लोटल्यानंतरहि त्यांची मनं जुळत असल्या-सारखं माईना दिसेना, तेव्हां त्यांचं मन अस्वस्थ होऊ लागलं. त्यांच्या मनाविरुद्ध ती गाण्याच्या क्लासला जाऊ लागली, अभ्यासा-कडे तिचं दुर्लक्ष होत असल्याचं त्यांच्या लक्षात आलं तशा त्या मनात म्हणू लागल्या, 'हिच्या मनात आहे तरी काय?' दिनकर तिला आवडत असल्यासारखी ती कधी वागे, तर कधी त्यांचा उल्लेखहि मोठ्या युक्तीनं टाळी. ती असा हा लपंडाव कां खेळत आहे हे त्याना कळेना. त्यांच्या मनासारखी ती वागेना, हट्टानं गाण्याच्या क्लासला जाऊ लागली तेव्हा त्याना वाटलं होतं की आपण काहीहि तिला सांगण्यापेक्षा दिनकरनं सांगितलं तर कदा-चित् ती त्याचं ऐकेल. एका दगडानं दोन पक्षी मारण्याचा प्रयोग त्या करून पाहाणार होत्या. जे सांगायचं ते दिनकरकडून त्या तिला सांगणार होत्या, तिच्या मनाचा अंदाजहि त्या घेऊन पाहा-णार होत्या. पण बापूसाहेबानीच 'कुणाचं ऐकेल म्हणता? दिन-करचं?' असं विचारलं तसा आपल्या मनातला विचार त्यानी ओळखला याचा आनंद त्याना झाला, तसं त्यांचं मन जरा निवलं.

माईंची अपेक्षा होती कीं गाण्याच्या क्लासला जाण्याऐवजी सध्या तिनं अभ्यासात लक्ष घालावं असं दिनकरनं सांगितलं की ती त्याचं खात्रीनं ऐकेल. एकदा नेहमीसारखा दिनकर त्यांच्याकडे आला होता आणि अलका घरी नव्हती. ही संधि साधून माईनी त्याला सगळं सांगितलं आणि त्या त्याला म्हणाल्या,

"मी पुष्कळ वेळा सांगून पाहिलं, पण तिला हे नवं वेड लागलंय् आताशा..."

"पण मी काही सांगून उपयोग होईलसं मला वाटत नाही, माई!..."

"ती तुझंच ऐकेल..."

"असं मलाहि वाटलं होतं..."

"मग?..."

"ती काय म्हणाली ते सांगू?..."

"काय म्हणाली?..."

"तुम्हीहि चला गाण्याच्या क्लासला. मला गाणंच आवडत नाही हे तिला माहित होतं म्हणून मला निरुत्तर करण्यासाठी ती असं सांगत होती हे मी ओळखलं आणि तो विषयच सोडून दिला मी..."

"पण आताशा तिचं अभ्यासाकडेहि नीटसं लक्ष नाही. घरातहि नाही..."

"अस्सं?...."

दिनकरनंहि या गोष्टीबद्दल आश्चर्य व्यक्त करावं याचं माईना मोठं नवल वाटलं. त्यांची कल्पना होती की हळुहळु ती एकमेकाना आवडू लागली आहेत. 'येवढी कसली घाई झालीय् तुला?' असं अलका म्हणत असली तरी आज नाही उद्या ती अधिक जवळ येतील आणि सारं सुरळित होईल. पण दिवस जात होते तसं त्यांच्यातलं अंतर कमी होण्याऐवजी वाढत होतं अशी शंका माईना येऊ लागली होती. असं होता कामा नये असं त्याना वाटत होतं. अलकाची एकदा परीक्षा आटोपली, ती पदवीधर झाली आणि तिचं लग्न झालं कीं सारं सुरळित होईल, होणार होतं या अपेक्षेनं त्या आला दिवस घालवीत होत्या. दिनकर जावई होऊन एकदा घरात राहायला आला की संसाराची विस्कटलेली घडी नीट बसणार होती. त्यांच्या आयुष्याला निवांतपणा येणार होता, निश्चितपणा येणार होता. म्हातारपणी आपली लेक आणि आपला जावई आपल्याजवळ आहेत या खात्रीनं त्याना नवा भरवसा वाटणार होता. दिनकरच्या बोलण्यावरून आणि गंगू-ताईंच्या मूक संमतीवरून त्यानी हे अनुमान स्वतःशी काढलं. त्या दिवसापासून त्या निश्चित झाल्या होत्या.

पण अलकाचं वागणं त्याना काही ठीक दिसत नव्हतं. आपण काहीहि सांगावं आणि तिच्या ते मनाला येऊ नये असं होऊ लागलं तशा त्या मनातल्या मनात कुढू लागल्या. त्यांचा कोंडमारा होऊ लागला. हिच्या मनात तरी काय आहे याचा अंदाजच त्याना घेता येईनासा झाला. त्या अस्वस्थ होऊ लागल्या, मोकळेपणानं अलकाशी बोलेनाशा झाल्या.

## स्त्रिया व क्रिकेट :

**अस्सल भारतीय व मद्रासकडील दत्ता फडकर हा पूर्वीच्या जमान्यातील मोठा देखणा खेळाडू. हा एकदा क्षेत्ररक्षण करीत होता. सामना पाहण्यासाठी एक मद्रकन्या आपल्या प्रियकरा-बरोबर आलेली. तिने त्याला विचारले, "हा देखणा खेळाडू कोण?" प्रियकर उत्तरला, "सिली मिड्ड-ऑफ". क्षेत्ररक्षणातील त्या जागेचे नांव ठाऊक नसलेल्या त्या सुंदरीला वाटले मत्सरामुळे आपला प्रियकर त्याला सिली (मूर्ख) म्हणत आहे. ती पुन्हा म्हणाली, "तो किती देखणा आहे? तो मूर्खासारखा दिसतो काय ? त्याला देखणा म्हटल्याबद्दल इतका मत्सर वाटायला नको काही!" आता या प्रियकराने काय सांगायचे कपाळ.**





अलकाच्याहि हे लक्षात आल्यावांचून राहिलं नाही. आईला अलीकडे झालंय् तरी काय हे तिला कळेना. घरातला मोकळेपणा नाहीसा झाला होता हे तिला कळत होतं, पण तीहि मनात म्हणत होती, 'मी तरी काय करू?'. . . .

आपल्या वागण्यातहि अलीकडे फरक पडत चालला नाही ना? अशी शंका तिच्या मनात येऊ लागली होती. पण आपलं हे वागणं आईच्या लक्षात येऊ नये अशा दक्षतेनं ती वागत होती, आईच्या मनाला दुःख होईल असं आपल्या हातून काहीहि घडता कामा नये हे तिला समजत होतं, पण हे सारं समजत असताहि त्याचा काही उपयोग होत नव्हता हे तिच्या लक्षात येताच ती हतबुद्ध होत होती.

तिला एकेकदा वाटत होतं, मी गाण्याच्या क्लासातच गेले नसते तर किती बरं झालं असतं, गेले नसते तर हेमंतची गाठ पडली नसती, दिनकरबरोबर त्याची तुलना मनानं केली नसती आणि सारं कदाचित् सुरळित झालं असतं. पण हेमंतची गाठ पडली होती आणि सारं बदललं होतं. त्याची संगीताची आवड लक्षात येताच तिच्या मनात आलं होतं, दिनकरला कां नाही वाटत आपण संगीत शिकावं असं? तो येवढा अरसिक आहे? होय, तसंच! ज्याला संगीताची आवड नाही त्याला संस्कृत कवीनं पुच्छविषाणहीन पशु म्हटलं आहे ते खरंच नव्हे?. . .

या विचारानं ती दचकली होती. अशी तुलना करणं योग्य नव्हे असं तिचं मन तिला सांगत होतं. पण नकळत तिचं मन दिनकरची आणि हेमंतची तुलना करीत राहायचं. त्याच्या सहवासासाठी तिचं मन भुकेलेलं राहायचं. तो तिच्यासारखाच संगीताच्या क्लासला यायचा, प्रथम प्रथम तिच्याकडे आधाशी कटाक्ष टाकायचा. त्या त्याच्या नजरेत स्वतःला जिंकून टाकणारी अमृत संजीवनी आहे याचं भानच तिला राहायचं नाही. ती त्याला टाळायची, त्याच्याकडे पाहायचं नाही, असं मनानं ठरवायची, पण तिची दृष्टि नकळत त्याच्याकडे वळायची. तिचा अहंकार यामुळं दुखवायचा. मी काय दुबळी आहे असा प्रश्न तिचं मन तिला करायचं. दिनकर आपणावर मनोभावानं प्रेम करीत असता त्याची अशी फसवणूक करणं हे वेडेपणाचं आहे या विचाराचे दंश तिच्या मनाला मधून मधून व्हायचे, पण संध्याकाळी गाण्याच्या क्लासची वेळ झाली कीं घरातून तिची पावलं बाहेर पडायची ती हेमंत आता संध्याकाळी भेटणार आहे, कसल्या तरी रोमांचानी आपलं सर्वांग मोहरणार आहे, या आशेच्या धाग्याला चिकटून. ओंजळीत धरलेलं पाणी मनाचा कितीहि निग्रह केला तरी बोटांच्या फटीतून ओघळावं तसा तिच्या मनाचा अहंकार क्षणाक्षणाला गळू लागला होता. जे करू नये असं ती आपल्या मनाला शिकवीत होती ते केल्यावांचून तिला राहवेनासं झालं होतं. . . . .

तिला वाटे दिनकरपेक्षा हेमंत किती निराळा आहे! पण हे निराळेपण कशात आहे याचा अंदाज तिला घेता येत नव्हता. दिनकरपेक्षा तो देखणा होता असं तिला वाटू लागलं, तसं तिचं तिलाच हसू येऊ लागलं. तिच्या असंहि मनात येऊ लागलं कीं हेमंतच्या ठिकाणी जे बुद्धीचं तेज आहे ते दिनकरजवळ नाही . .

पण सध्या तो कॉलेजात डेमॉन्स्ट्रेटर असला, तरी नागपूरला त्याच्या वडिलांची जी फॅक्टरी आहे तिची सारी जबाबदारी त्याच्यावर येऊन पडणार आहे. वडील थकत चालले आहेत, मुंबईतली नोकरी सोडून ये असा त्यांचा सारखा आग्रह चालला आहे हे सारं तिनं हेमंतच्या तोंडून ऐकलं तसा तिच्या मनाचा नवाच कोंडमारा होऊ लागला. आपण दिनकरशी लग्न करावं असं आईला कां वाटत होतं हे तिला ठाऊक होतं. ते झालं की दिनकर मुंबईतच त्यांच्या घरी येऊन राहाणार होता, घरजावई होणार होता, आपली लेक जन्मभर आपणाजवळ राहाणार होती, सारं सुरळीत चालणार होतं. माई याच आशेवर जगत होत्या हे अलकाला चांगलं माहित होतं. पण लगेच तिचं मन म्हणत होतं, आईला जन्मभर सोबत हवी म्हणून मला आवडलेल्या, हव्याशा वाटणाऱ्या हेमंतला मी दूर करू आणि निर्बुद्ध दिनकरच्या गळ्यात माळ घालू? छे, छे, नाही. असं कसं मला वागता येईल? . .

हेमंतच्या प्रीतीला साद द्यायची तर आईला दुखवायला हवं आणि आईला दुखवायचं नसेल तर नको त्या माणसाच्या गळ्यात माळ घालायला हवी असा मोठा विचित्र पेच तिच्या आयुष्यात निर्माण झाला होता. स्वतःच्या अंतःकरणातल्या प्रीतीला 'ओ' देण्याचा निर्णायक क्षण प्रेमिकांच्या जीवनात कधी तरी येतोच आणि त्यामुळे साऱ्या जीवनाची दिशाच बदलते तो क्षण आपल्या आयुष्यात आला होता हे तिनं ओळखलं होतं. हेमंतला 'हो' म्हणताना तिच्या मनात खोल कुठे तरी आनंदाच्या गुदगुल्या होत होत्या, पण आईचा विचार आपल्या मनात कसा येत नाही या विचारानंहि तिचं मन घायाळ होत होतं. काही झालं तरी आपलं



बरं का, तू तल्यारखान हो आणि मी पतौडी होईन...





अनुक्रमणिका



## वेडे प्रियकराच्या भेटीस जाताना

दिवटीप्रमाणे चमचमणारा भरगच्च हिऱ्यांचा हार तू गळ्यात घातला आहेस; नितंबाच्या घेरावर काची बांधली आहेस. तिचा कचकचाट चालू आहे. पायात नूपुर बांधले आहेस त्याचा झणत्कार चालू आहे. ढोल वाजवीत मिरवणूक काढावी तसा हा प्रकार करून आपणास कोणी पहात तर नाहीना, अशा भयचकित दृष्टीनं तू सभोवार पहात आहेस. तुला आता काय म्हणावे?

(अमरु– ३१)

घरदार, फॅक्टरी, मातापिता याना सोडून हेमंत मुंबईला येऊन राहाणार नाही, आणि तो तसा येऊन राहाणं शक्य नाही तर आपणालाहि मायेचे सारे पाश तोडायलाच हवेत या निर्णयावर ती आली होती. . . .

हे सारं धीरानं, सावकाश करायला हवं, आईच्या मनाला एकदम धक्का बसणार नाही अशा सावधगिरीनं करायला हवं हे तिला समजत होतं. तिच्या मनात जे वादळ उठलं होतं ते तिला लपवायचं होतं, आपल्या वागण्यातून त्याची चाहूलहि आईला लागणार नाही अशी दक्षता तिला ध्यायची होती . . . .

पण तिच्या मनातलं हे रहस्य कसं आणि कधी माईंनी ओळखलं कुणास ठाऊक ? कारण ते ओळखल्यासारख्या त्या वागू लागल्या. आपल्या लेकीच्या वागण्यात, बोलण्याचालण्यात पडलेला सूक्ष्म फरक त्यांच्या लक्षात आला, पण तो उघडपणे बोलून दाखविणे शक्य नसल्यामुळं तिनं केलेली कोणतीच गोष्ट त्यांच्या मनाला येईनाशी झाली. त्या अलकावर चिडू लागल्या. . . .

आणि म्हणूनच ज्या ज्या प्रकारानी आईचं मन आनंदित ठेवता येईल त्या त्या प्रकारे ते ठेवायचं अशा नव्या धोरणानं ती वागू लागली. एखाद्या दिवशी माईना घेऊन ती बाजारात जाऊ लागली, एकदा बाबुलनाथच्या देवळात ती तिला घेऊन गेली, पार्ल्याला त्यांची एक लांबची नातेवाईक राहात होती त्यांच्याकडेहि ती आईला घेऊन गेली ती याचसाठी. . .

आज ती तिला 'नाझ'ला लागलेल्या चित्रपटाला घेऊन गेली होती तीहि याच हेतूनं. ती आनंदात असलेली दिसली कीं मग आपल्या मनातला विषय काढायचा असं मनाशी ठरवून ती वागू लागली. पण काही केल्या हवी ती संधि तिला मिळेना. आपण तिला जे सांगणार आहोत ते ऐकून आपल्या आईला धक्का बसणार आहे हे तिला माहित होतं, पण त्याचा आघात तिच्या मनावर फार मोठा होणार नाही अशा सावधगिरीनं वागणं आवश्यक आहे म्हणून ती चालढकल करीत होती, पण कधी तरी सारं आईला सांगायलाच हवं हे तिला माहीत होते. . . .

मात्र आता हे सारं वेळ न लावता आईला साऱ्या गोष्टी सांगायलाच हव्यात अशा निकरावर गोष्टी आल्या त्या अनपेक्षितपणे. एके दिवशी संगीताच्या क्लासमधून बाहेर पडताना हेमंत तिला म्हणाला,

"तू मला आपल्या आईकडे घेऊन जाणार म्हणून रोज सांगतेस, पण——"

"पण मला मुहूर्त मिळत नाही, असंच ना ?"

"तो आता तू शोधून काढला नाहीस तर नागपूरला माझे वडीलच शोधून काढतील—"

"म्हणजे ? मी नाही समजले ? . . . . . ."

"त्याना सारं माहीत आहे, अलका !"

"म्हणजे तू त्याना कळवलंस ? . . . . . . ."

"मी नाही ! आपले संगीत शिक्षक बाबांचे मित्र आहेत, त्यानीच."

"म्हणजे त्यानासुद्धा हे समजलं ? . . ."

"अग मांजरानं डोळे मिटून दूध प्यायचं ठरविलं तरी . . . ."

"समजले, समजले. येवढी काही वेडी नाही मी ? . . ."

ती संध्याकाळी घरी आली ती विलक्षण अस्वस्थ होऊन. आता वेळ न लावता आईला सारं सांगायलाच हवं असं मनाशी ठरवून. पण ते तिला कसं सांगावं हेच अलकाला समजेना. ते सांगितलं की तिच्या साऱ्या सुखस्वप्नांचा कसा चुराडा होणार आहे हे तिला समजत होतं, पण ती स्वतःशी पुनः पुन्हा म्हणत होती, "मी तरी काय करू? मी तरी काय करू?" . . . रात्री तिला झोप लागेना. एका कुशीवरून दुसऱ्या कुशीवर अशी ती सारखी तळमळत राहिली. . . आईला जे सांगायचं आहे ते सांगितलं कीं आपलं मन शांत होणार होतं खरं, पण दिनकरशी माझं लग्न होणार, तो घरात येऊन राहाणार, आमची दोघांची अखंड सोबत तिला लाभणार आणि एकलकोंडं, भकास जिणं आपल्या नशिबी येणार नाही अशा कल्पनेत आज इतके दिवस ती वावरत आहे त्या तिच्या कल्पनेला तडा जाणार या विचारानं अलकाचं मन बेचैन झालं. यातून मार्ग तरी कसा काढायचा हेहि तिला सुचेना तशी ती अधिकच अस्वस्थ झाली आणि शेजारच्याच कॉटवर झोपलेल्या आईकडे तिनं पाहिलं आणि ती स्वतःशीच पुटपुटली, "आई, तुला मी फवसणार आहे. पण मी तरी काय करू? आज इतकी वर्षे तू मला सांभाळलंस, वाढविलंस, पण अखेर माझ्या मार्गानं मला जाण्यावांचून गत्यंतर नाही, पण खरंच तू माझ्यावर रागावशील? मला नाही असं वाटत, आई? आपल्या सुखासाठी आपल्या मुलीनं स्वतःच्या सुखाचा बळी द्यावा असं कसं वाटेल तुला, आई! . . ."

तिनं झोपलेल्या आपल्या आईकडे टक लावून पाहिलं तसा तिला हुंदका आला, पण माईना त्याची कल्पनाहि नव्हती! . . .

( पृष्ठ ५१ वर पहा )











यंदाच्या दिवाळी अंकात प्रसिद्ध झालेला 'पूर्वार्ध' वाचून अनेकांनी संपूर्ण कथा एकाच अंकात न दिल्याबद्दल हुरहूर व्यक्त केली—त्या कथेचा हा उत्तरार्ध

—अरविंद ताटके



**नर्मदा** नदी खळाळत होती अन् दोन प्रेमी जीव तिच्या काठावर बसून आपली प्रेमपूर्ति करीत होते, देहाची भूक भागवीत होते, निसर्गाचा धर्म पाळीत होते. रूपमती अन् बाजबहादुर आज बेहोषीत होते, धुंद होते. शर्त पुरी झाल्यानं शादीचा प्रश्न सुटला होता अन् त्यामुळं त्यांच्या तारुण्यातल्या खेळांना घरबंद उरला नव्हता. त्यांच्या प्रेमाला जणु भरती आली होती. रुपमतीचा लुसलुशीत हात कुरवाळीत बाजबहादुरनं झटकन् तिच्या भोवती बाहुपाशाचा विळखा घालीत म्हटलं,

"रूप, शर्त पुरी झाली. आता शादीला काही हरकत नाही ना?"

रूपमती धुंदीत होती. आपल्या प्रियकराच्या बाहूत विसावत होती. तिनं नुसतं 'हुं' केलं.

"मग शादी कधी उरकायची रूप?"

"एक गोष्ट ऐकाल का?"

"एक का. दहा ऐकेन"

"शादी मंदिरात उरकू या. देवाला नमस्कार कराल ना? तुमच्या अल्लाला ते मंजूर होईल ना?"

"रूप, माझं दिल् आता तुझ्या हातात दिलंय्. तुमचा देव नि आमचा अल्ला काय वेगळा आहे? आपण सारी एकाच देवाची लेकरं. हे भेद सगळे लबाड माणसांनी निर्माण केले. आपण शादी देवळात जरूर उरकू. मला मंदिर अन् मशीद सारखीच प्रिय. आता झालं ना तुझं समाधान?"

"पण मी ऐकते की मुसलमान नबाबांचा जनानखाना मोठा असतो म्हणून! पुढं तुम्ही मला अंतर देणार नाही ना?"

"आली का शंका पुन्हा. अग, इतमामाप्रमाणं आम्हाला जनानखाने बाळगावेच लागतात. त्यात मोठेपणाचाच भाग बराच असतो. तू घातलेली अत्यन्त कठिण शर्त मी पाळली तरी माझ्याबद्दल तू सांशकता दाखवावीस याचं मला वाईट वाटतं रूप. इतर स्त्रिया माझ्या अंतःपुरात कितीहि असल्या तरी माझ्या अंतःकरणात मात्र तूच सदैव राहशील. तूच माझी खरी बेगम. हवं तर पट्टराणी म्हण."

"असं हो काय. मी आपली थोडी थट्टा केली."

"तुझी थट्टा होते, पण माझा जीव गलबलतो."

"ते जाऊ द्या. उद्या सकाळी सूर्याच्या साक्षीनं आपण मंदिरात शादी उरकायची."

"जशी तुझी इच्छा, रूप. ज्यावेळी मी तुला प्रथम पाहिलं अन् तुझा गोड आवाज ऐकला तेव्हाच मी मनानं तुझ्याशी शादी केली. म्हणून तर जीव धोक्यात घालून तुला वांचविलं अन् तुझ्या शर्तीसाठी अनेक मंडळीना राबवून मी तुझी शर्त पुरी केली. नावाप्रमाणं तू खरोखर रूपवती आहेस. तुझ्या सहवासात माझं मन रमेल. दरबारचा सारा शीण तुझ्या स्पर्शानं नाहीसा होईल. तुझ्या आवाजीनं मला आराम मिळेल. आणखीहि माझं एक स्वप्नं पुरं होईल."

"कुठलं स्वप्नं?"

"आत्ता नको. नंतर सांगेन".

"बरं. पण उद्या सकाळी मंदिराजवळ या.

"कितींदा सांगशील आता !"

निघण्यापूर्वी एकमेकांच्या मिठीत पुन्हा एकदा ते प्रेमी जीव विसावत होते. धर्मबंधनं न मानणाऱ्या त्या प्रेमिकांकडे सूर्य कौतुकानं पहात पहात कलत होता अन् रूपमती अन् बाजबहादुर यांची घोडी आपआपल्या दिशेनं चालू लागली होती.

☆☆

सूर्याच्या साक्षीनं रूपमती अन् बाजबहादुरनं कृष्ण मंदिरात लग्न लावलं अन् ती बाहेर पडणार तोच सोसाट्याचा वारा आला अन् देवासमोरची समई खणकन् खाली पडून विझली.

"हे लक्षण ठीक नाही दिसत मला" रूपमती कापत बोलली.

"रूप, या आनंदाच्या प्रसंगी असं कां बोलतेस?"

"समई अशी पडून अकस्मात् विझणं आमच्यात अशुभ मानतात म्हणून."

"चल, वेडी कुठली." असं म्हणून बाजबहादुरनं तिला बाहुपाशात घेऊन तिचं तोंड बंद घेतलं.

दोघं गडावर कुंडाजवळ येऊन ठेपली. रूपमतीनं कुंडातलं थंड पाणी तोंडाला लावलं. बाजबहादुर ते दृष्य आनंदानं, कौतुकानं पहात उभा होता.

"छान आहे पाणी अगदी. आता माझ्या आवाजाला काही भीति नाही. हो! आणखी एक गोष्ट केली का?" रूपमती बोलली.

"कसली?"

"आठवा ना!"

"नाही आठवत!"

"अंगुर बाग केलीत का?"

"धीर धर ना जरा. तीहि दाखवतो. पण मला ही अंगुरंच आवडतात." असं म्हणून त्यानं रूपमतीच्या गालाचे पटापट मुके घेतले.

"इश्श! कुणी पाहील ना!"

"आता कुणाची भीति आहे?"

"पण अंगुर बाग दाखवता ना?"

"चल तर."

कुंडापासून फर्लांगावर विस्तीर्ण अंगुर बाग पसरली होती अन् तिथं वेलावर द्राक्षांच्या घोसांचे घोस डौलदारपणे लटकत होते. ते पाहून रूपमती अगदी खूष झाली.

"झालं ना मनासारखं." बाजबहादुर म्हणाला.

"हो. या बागेत माझी काव्यशक्ति फुलेल, माझ्या गायन कलेला बहर येईल."

"माझं पण एक स्वप्नं आहे, रूप !"

"हो, तुम्ही मागे म्हणाला होतात. आता सांगा ना!"

"तुला जशी गाण्याची आवड आहे तशीच मला आहे. ख्याल गायकी मी पूर्णावस्थेला नेलीय्."

"काय? तुम्ही गाता?" रूपमतीनं थट्टेनं म्हटलं.

"हो रूप! आतापर्यंत मी तुला त्याविषयी फारसं कधी सांगितलं नाही. मी पूर्णावस्थेला नेलेली ख्याल गायकी कुणी फुलवील, त्याची कीर्ती चिरकाल टिकवील असा शिष्य मला मिळालाच नाही. प्रथम भेटीच्या वेळी तुझा आवाज ऐकला तेव्हा माझी खात्री झाली की माझा वारसा तूंच चालवशील अशी."

"मग काय आता मला रोज तालीम देणार तर!"

रूपमती हसत हसत बोलत होती.

"संगीताची उपासना करीत करीत आपण संसार करू !"

"तुमच्या इच्छेबाहेर मी नाही."

तेवढयात बाजबहादुरानं द्राक्षाचा घोस अलगद काढला अन् त्यातलं एक मधुर अन् टपोरं द्राक्ष त्यानं रूपमतीच्या तोंडात टाकलं.

"शिष्याला गंडा बांधण्याचा हा प्रसाद की काय." रूपमती म्हणाली.

"काही म्हण रूप, माझ्या कुवतीप्रमाणं मी तुझे सर्व मनोरथ पूर्ण केले. आणखी एक गोष्ट सांगायचीय्."

"ऐकतेय् मी!"

"तुझ्या सौंदर्यानं मी बेचैन झालो होतो. माणसं रात्रंदिवस खपत होती. पण नदीचं पाणी गडावर चढत नव्हतं. एक एक दिवस मला युगासारखा भासत होता. शर्त पुरी होईल की नाही या विवंचनेचा भुंगा माझं मन पोखरीत होता. अन् शरीर सारखी तुझी याद करीत होतं. बेचैनी दिवसेंदिवस वाढत चालली. ती विसरण्यासाठी मला एक नाद लागला."

"कोणता?"

"मी शराब घेऊ लागलो, रूप!"

"पण आता मी आहे ना!"

"ते खरं रूप. पण तुझ्या डोळयात मला सारखी शराब दिसते. कधी कधी मी ती घेतली तर चालेल ना?"

"घ्या बापडे. पण तिच्या अन् माझ्या नादात दरबारला रजा देऊ नका म्हणजे झालं."

"रूप, एवढा का मी बेवकूफ आहे.?"

"असं कुठं मी म्हटलं?"

अंगुर बागेत दोघंच होती. हळु हळु दोघंजणं महालात आली. रात्र झाली अन् गडावर सर्वत्र सामसूम झाली. शृंगारलेल्या महालात बाज अन् रूप बसली होती. अन् त्यांच्या शृंगारानं अर्धी रात्र सरत होती. अधुनमधून बाजबहादुर रूपमतीचं गाणंहि ऐके. तिचं सौंदर्य तो लुटीत होता पण तृप्ती होत नव्हती. तिच्या आवाजीच्या सूरात तो बेहोश झाला अन् तिच्या धुंद नजरेमुळं त्याची शृंगाराची धुंदी मुळीच उतरत नव्हती. तेवढ्यात रूपमती त्याला बिलगली अन् हळूच बोलली—

"आता पुरे. पण एक मागणं आहे."

"सांग. वाटेल ते माग!"

"गाणं कधी ऐकवणार.

"आज जमेल का?"

"कां नाही जमणार...? आज प्रीतीची पहिली रात्र तुमच्या गायनानंच पुरी करू या."

"जशी तुझी इच्छा, रूप!"

रूपमतीनं तंबोरा उचलला अन् त्याच्या हातात दिला. बाजबहादुरनं गायनास सुरुवात केली. प्रथम रंग भरेना, रूपमतीलाहि त्यात गोडी. बाजनं तंबोरा बाजूला ठेवला.

"रूप, ती सूरई इकडे आण. त्यातलं थोडं मद्य घेतल्याशिवाय माझा आवाज नाही लागायचा. नंतर पहा माझी करामत."




सुरईतलं मद्य बाजबहादुरनं घटाघट घेतलं अन् मग त्याच्या आवाजाला जी धार चढली त्यानं रूपमती चकीत झाली. ख्याल गायकीचं ते विलक्षण रूप पाहून तिचं मन आनंदानं शहारून निघालं. पहाट झाली तशी रूपमती उठली. नि तिनं बाजबहादुरचे पाय धरले. त्यानं तंबोरा खाली ठेवला अन् तो पुटपुटला, "हे काय रूप?"

"गायनकलेत मी आपली शागिर्दी पत्करलीय्!"

"बस्स्. माझं स्वप्नं आता पुरं झालं."

"मग तालीम केव्हापासून देणार?"

"म्हणशील तेव्हापासून."

"उद्यापासून ?"

"माझी ना नाही, रूप !"

पहिली रात्र अशा धुंदी—मस्तीत, सुरांच्या आलापीत गेली खरी पण पुढच्या साऱ्या रात्रीहि अशाच सुस्तीत अन् रागांच्या सुरावटीत जाऊ लागल्या. त्यामुळं बाजबहादुरचं जीवन मात्र बदसूर होत गेलं. रूपमती गायकीत निपुण होत गेली पण बाजबहादुराचं राज्यकारभारातलं लक्ष मात्र साफ उडालं. रूपमती आल्यापासून मानखानाला बाजबहादुर अजिबात विचारीना, त्याचं गाणं कधी ऐकेना. उलट त्याच्यापाशी तो रूपमतीची स्तुती करू लागला. त्यामुळं दुष्ट मानखान संतापानं जळू लागला.

☆☆

दिवस जात होते, पण बाजबहादुरच्या दिनचर्येत फरक पडत नव्हता. हा मर्द माणूस पुढं पुढं दिवस-रात्र रूपमतीच्या मिठीत रमू लागला. दंग होऊ लागला. जोडीला शराबपानहि अखंड चालूच असायचे. दरबार महिनेच्या महिने भरेना. कारभारात ढिलाई आली. सगळीकडे बेदिली माजली. कुणाचा पायपोस कुणाच्या पायात राहीना. रूपमतीला हे वर्तमान ठीक वाटेना. पण ती बाजबहादुरला आवरू शकली नाही. तिच्या तारुण्याची कळीहि नुकतीच कुठं उमलत होती, फुलत होती. नवऱ्याच्या सहवासात तिच्या ख्याल गायनाचा रियाज चालूच होता. तो आपली कला तिला मुक्तहस्ताने देत होता. अन् तीहि कष्टाने ती कला हस्तगत करीत होती. शराब अन् वासनेनं बाजबहादुरचा देह पोखरीत चालला. सूडानं जळणारा मानखान या गोष्टी पहात होता. रूपमतीच्या सौंदर्याचाहि तो द्वेष करू लागला. अखेरीस बाजबहादुरच्या कारभारातील ढिलाई अन् रूपमतीचं सौंदर्य याची कहाणी त्यानं दिल्लीला कळविली.

दिल्लीस अकबराच्या पदरी तेव्हा अधमखान नावाचा एक सरदार होता. नावाप्रमाणंच तो अधम होता. हुमायुनचा तो रक्षापुत्र असल्यानं अकबरहि त्याच्याकडं थोडं दुर्लक्ष करी. म्हणून त्याच्या दरबारात अधमखानाचं मोठं प्रस्थ असे. मानखानानं कळविलेली हकीकत अधमखानाच्या कानावर जाण्यास वेळ लागला नाही. त्यानं रूपमतीला पळविण्याचा डाव टाकला. दोनशे फौजबंद गडी घेऊन तो मांडवगडाखाली आला. त्यानं बाजबहा-

दुरकडे जासूद पाठवून भेटीची विनंती केली. बाजबहादुरनं त्याला भेटीस बोलावलं. भेटीत अधमखानानं बाजबहादुरला म्हटलं,

"आम्ही आपल्या बेगमेच्या खूबसूरतपणाची कीर्ती बरेच दिवस ऐकतोय्."

"आपल्या बोलण्याचा मतलब मला नाही समजला." बाज-बहादुर म्हणाला.

"सारी दिल्ली आपल्या बेगमेच्या सौंदर्याची नि गाण्याची तारीफ करतेय्. ही गोष्ट शहेनशहाच्याहि कानी गेलीय्."

"मग म्हणणं काय आपलं?"

"स्पष्ट बोलतो याबद्दल माफी असावी. बादशहानं रूपमतीला आपली बेगम करण्याचं ठरवलंय् अन् तिला नेण्यासाठी त्यानी मला पाठवलंय्."

"खामोष! आपण बादशहाचे सरदार नसता तर आपली गर्दन आज जागेवर नसती राहिली. शहेनशहा शहाणा आहे, विचारी आहे, विवेकी आहे. असली मागणी तो कधी करील असं मला वाटत नाही. पण आपण म्हणता ती गोष्ट खरी असेल तर बादशहाना आमचा निरोप सांगा की त्यानी त्यांच्या बेगमेला आमच्याकडे आधी धाडावं. नंतर आम्ही रूपमतीला तिकडे धाडा-यची कीं नाही त्याचा विचार करू. जा, चालते व्हा. पुन्हा नका मला तोंड दाखवू. पुन्हा दिसलात तर जबान काटली जाईल." एवढं बोलून बाजबहादुरनं अधमखानाला घालवून दिलं. तो दिल्लीस गेला पण विषारी फुत्कार सोडीत.

बाजबहादुरचं डोकं भणभणून गेलं. महालात तक्तपोशीवर बसून तो सुरईतून दारू घेत बसला होता. रूपमती जवळच होती. आज काही तरी बिनसलंय् याची अटकळ तिनं केव्हाच बांधली. ती त्याच्यापाशी गेली अन् हळूच बोलली—

"कोण आलं होतं दिल्लीहून आज?"

"आला होता एक बादशहाचा लाचार सरदार"

"काय म्हणत होता तो?"

"काय सांगू रूपमती?"

"सांगण्यास शरम वाटते !!"

"मग तर जरूर सांगा"

"बादशहाला तू हवीस असं तो नीच म्हणत होता"

"आपण काय जबाब दिलात?"

☆☆

"शहेनशहाच्या मनात असा विचार येणार नाही असं मी म्हटलं. पण जर हे खरं असलं तर बादशहानं आधी आपली बेगम आमच्याकडं धाडावी. नंतर आम्ही आमची बेगम पाठवायची की नाही त्याचा विचार करू, असा जबाब दिला मी त्याला."

"असला अविचार बादशहा कधी करणार नाही. त्या सर-दाराच्या मनातच काही काळंबेरं असेल. तो काहीतरी तिखट-मीठ लावून शहेनशहाला सांगेल अन् त्यामुळं नसती आफत मात्र आपल्यावर ओढवेल."

"चिडून जाऊन बादशहा फार तर फौज धाडील ना. त्याच्या सैन्याशी मुकाबला करण्याची ताकद माझ्या तलवारीत भरपूर आहे, रूप! माझी लाश तुडवूनच बादशहाला तुला नेता येईल."

"आपल्या शौर्याची का मला खात्री नाही? पण बादशहाच्या प्रचंड सैन्याशी तोंड देणं आपल्यासारख्या छोट्या नबाबाला जड जाईलसं मला वाटतं. वाईट एवढंच वाटतं की हे संकट माझ्यामुळं आपणावर ओढवतंय् !"

"अग बायकांवर नजर ठेवण्याची ही संवय मोंगलाईला काही नवीन नाही. अकबर बादशहा तसा नाही असं मला अजूनहि वाटतं. पण तसं काही त्याच्या मनात असेल तर तुझ्यासाठी जीव कुर्बान नाही करायचा तर मग जिवंत तरी कशाला रहायचं?"

"त्याची खात्री आहे मला, बाज. पण आपलं काही बरं वाईट झालं तर माझीहि लाशच त्यांच्या हाती लागेल याची खात्री तुम्ही ठेवा."

"बस्स्. मला तरी जास्त काय हवं रूप. कसला घाणेरडा विषय काढलास ग? अग उगीच फिकीर तरी किती करायची. तकदिरात असेल ते चुकायचे नाही, भोगावंच लागतं ते प्रत्येकाला."

एवढं बोलून सुरईतून सुवर्णपात्रात बाजबहादुरनं शराब ओतली अन् त्यानं अखंडपानास सुरुवात केली. रूपमतीला बाहुपाशात घेऊन तो तिच्या पाठीवरून हात फिरवीत बसला. पुढं पुढं नाच-रंग, शराब, ख्यालिखुशाली अन् रूपमती यांच्या संगतीत त्याचा सारा वेळ जाऊ लागला. मानखानाची कारस्थानं चालूच होती. सूडानं दिल्लीस गेलेला अधमखान अकबराचे कान फुंकीत होता. बाजबहादुराचा जबाब त्यानं तिखटमीठ लावून अकबराला सांगितला. त्याला अधमखानाच्या आधीच्या कारस्थानाची काहीच कल्पना नव्हती. "आपली बेगम धाडा" हे बाजबहादुरचं वाक्यंच त्यानं खरं मानलं. त्यानं प्रचंड फौज पाठवून बाजबहादुरला गिरफदार करण्याचा हुकूम सोडला. त्या मोहिमेचं सेनापतित्व अधमखानालाच त्यानं दिलं.

ही वार्ता बाजबहादुरला समजण्यास वेळ लागला नाही. त्याची धुंदी उतरली. शराबाचा पेला त्यानं फेकून दिला. त्याचे बाहु फुरफुरू लागले. त्यानं कडेकोट तयारी केली. दरबार भरवून सरदाराना सूचना देऊन फौजबंद राहण्याचा हुकूम दिला. अन् गडावर मोर्चे लावून जय्यत तयार रहाण्याची ताकीद दिली. नंतर त्यानं जसवंतसिंगाला बोलावणं धाडलं. जसवंतसिंग हजर झाला.

"या जसवंतसिंग!"

"काय सेवा करू खाविंद! आज्ञा व्हावी."

"आम्ही स्वारीवर चाललोय्. कारण तुम्ही ऐकलंच असेल. आमची फत्ते होईल ना?"

"माझा आपल्याला आशीर्वाद आहे, धनी. वडिलांपासून आपलं अन्न खातोय् मी. पण आपण विचारलेला प्रश्न माझ्या बुद्धिपलिकडचा आहे सरकार. प्राक्तनात असेल तेच घडेल हुजूर."








"ते तर या प्रकरणाच्या सुरुवातीलाच आपण मला सांगितलंय्, जसवंतसिंग. माझ्या जीवाचं मला भय नाही वाटत. मला काळजी वाटते रूपमतीची, जसवंतसिंग."

"त्यांची चिंता सरकारनी करू नये. पराभव झाला तर रजपूत स्त्रिया जोहार करतात, सरकार. तशी आमची परंपरा आहे. आपल्या बेगमसाहेब ती परंपरा कधी नाही सोडणार, खाविंद. आपण निर्धास्त असावं, खाविंद."

"पिताजींच्या वेळेपासून आपण केलेली अनेक लढायांची भाकीतं खरी ठरली, जसवंतसिंग. मग आजच आपण तकदीरचा हवाला कां देता, जसवंतसिंग?"

"त्याचं उत्तर मी आपल्याला शादीच्या आधीच दिलंय्. एवढं खरं कीं रूपमती मोंगलाच्या हाती कदापि लागायची नाही, सरकार! रजपूत रक्त आहे ते!"

'बस्. एवढंच उत्तर मला हवं होतं तुमच्याकडून. आता तुम्ही जाऊ शकता. जगलो वाचलो तर भेटेन पुन्हा!"

जसवंतसिंग डोळे पुशीत निघून गेला. मोंगलांची फौज पायथ्याशी येऊन थडकली होती. बाजबहादुरचे सारे सरदार तयार होते बाहेर. ते फक्त त्याचीच वाट पहात होते. बाजबहादुरनं आपला लढाईचा पोशाख पेहेरला. तरवार घेतली. अंगात चिलखत घातलं. रूपमती जवळच होती.

"रूप, मी निघालोय्" भरलेल्या आवाजात बाजबहादुर बोलला.

"थांबा." रूपमती रडत रडत बोलली.

"रूप तेरे आँखो में आंसूं! तू रजपूत छोकरी ना?"

रूपमतीनं लागलीच डोळे पुसले.

"रूप, तुझ्या रूपावर अन् गोड गळ्यावर मी मोहब्बत केली. तुला बेगम केलं. तुझ्या सहवासात दिवस कसे गेले ते समजलंहि नाही. माझी सारी विद्या तुला दिली. तुझी शर्त पाळण्यासाठी मी अनेकांचा रोष पत्करला. त्यांचे शिव्याशाप आज बाधताहेत. तुझ्यासाठीच हे रणकुंड पेटतंय् ! जगलो वांचलो तर आपलं संगीत चालूच राहील. पण फांसा उलटा पडला, तार तुटली, प्राक्तन फिरलं तर तू माझीच सोबत करशील ना? एवढीच भीक मला हवी आहे, रूप! माझ्या विद्येची ती गुरुदक्षिणा समज हवी तर ती."

"अशी निरवानिरवीची भाषा कां बोलता बाज? आपला जयही होईल. कुणी सांगावं?"

"तसं झालं तर कुणाला नकोय ते. पण माणसानं वाईट बाजूच धरून चालावी, रूप. मला तुझीच काळजी वाटते, रूप. तुझ्या सहवासात सगळं भोगलं. पैशाकडं पाहिलं नाही. खजिना रिकामा केला. तुला काही ठेवलं नाही. ठेवलीय् ती फक्त कला. म्हणून मला वाईट वाटतं. अल्लाच्या दरबारातहि तू माझी सोबत करशील अशी मला खात्री होती म्हणूनच मी मनःपूत वागलो, रुबाबानं राहिलो; मिजाशीत वाढलो."

"आपण निर्धास्त असा, बाज. आपला विश्वास मी खोटा नाही पाडणार. आपल्या मागं मी देह ठेवणार नाही याची खात्री बाळगा."

"बस्स. निघतो मी आता."

"थांबा. कुंकुमतिलक लावते. आमची परंपरा आहे तशी."

कुंकुमतिलक लावला तोच करंडा खाली कोसळला. रूपमती दचकली, गोंधळली.

"समजलो रूप. कुंकुवानंहि अशुभ कौल दिला ना! जशी अल्लाची इच्छा!"

एवढं बोलून बाजबहादुर तडक बाहेर जाऊन सैन्यात मिसळला. त्याच्या सगळ्या सरदारानी प्राणांची शर्थ केली, पण मोंगलांच्या प्रचंड सैन्यापुढं त्यांचा निभाव नाही लागला.

केशरी शाल पांघरून रूपमती कृष्णाच्या मूर्तीपुढं ख्याल छेडीत बसली होती. तिचा आवाज भरून आला होता. जसवंतसिंग पलीकडे उभा होता. ती बेभानपणं गात होती. मध्येच काय झालं कुणास ठाऊक. तंबोऱ्याची तार खळकन् तुटली. तेवढ्यात दार वाजलं म्हणून जसवंतसिंग ते उघडण्यास गेला. दार उघडलं. समोर सरदार उभे होते. त्यांच्या माना खाली होत्या. "धनी गेले, जसवंतसिंग!" एवढेच एक सरदार पुटपुटला. रूपमतीनं दाराकडं सर्रकन् नजर फेकली. जसवंतसिंगाची खाली मान पाहून ती चमकली, चरकली. अन् मग जवळ असलेली विषाची कुपी तिनं चटकन् प्राशन केली.

जसवंतसिंग रूपमतीच्या जवळ आल्यावर त्याला तिचं फक्त कलेवरच दिसलं.

"पोरी, तुझं प्राक्तनच तसं ग!" असं बोलून त्यानं तिच्या अचेतन देहावर शाल पांघरली अन् तंबोरा बाजूला ठेवला.

[उत्तरार्ध]

---

**केशवसुत :** आधुनिक काव्यदर्शन



**झपूर्झा :** "हर्ष खेद ते मावळले, अश्रु पळाले, हास्य निमाले."

[२]

**एरॉल फिलन** ह्याने लिहिलेल्या **‘‘माय् विकेड् विकेड् वेज्’’** ह्या आत्मचरित्राचा परिचय मराठी वाचकाना घडविण्याचे दृष्टीने: **‘दीपावली’**च्या दिवाळी अंकापासून एक लेखमाला सुरू केली आहे. त्या लेखमालेचा **‘स्वयं-स्फोटक’** असा हा दुसरा हप्ता!!



**रोचक, रोमहर्षक, रोमांचित**

# ‘‘ऐतल मी ऐधुंद मी!’’

## प्रभाकर अत्रे

**न्यु** गिनी हे जगातले दुसऱ्या क्रमांकाचे बेट आहे. त्या बेटा-भोवती खूपशी लहानमोठी उपबेटे आहेत. त्यातल्या ‘न्यू ब्रिटन’ नावाच्या बेटाकडे एरॉल निघाला होता. बोटीवर पाऊल तर ठेवले, पण हातात पैसा नव्हता. मनासमोर सारी प्रश्नचिन्हेच होती. एका पोस्ट मास्तराची ओळख बोटीवर असताना झाली. एका स्त्रीनेही परिचय पत्र दिले. तिचा नवरा एक जिल्हाधिकारी होता. एरॉलने न्यु गिनीतली पहिली रात्र एका खेडवळ घराच्या छपराखाली काढली. डास तुफान चावत होते. झोप लागलीच नाही. नंतर ‘सॅनिटेशन’ ह्या विषयातले सर्व येते असे खोटेच सांगून एरॉलने नोकरी मिळविली. सरकारी मोटरीत बसून खेडोपाडी हिंडायचे आणि आरोग्याची पाहणी करायची हे काम त्याच्याकडे होते. पण ते त्याला लवकरच कंटाळवाणे वाटले. त्या दौऱ्यात त्याला एक सुंदर जलसंचय दिसला. आणि त्याची पोहण्याची ऊर्मि त्याला स्वस्थ बसू देइना! त्या तलावात पोहतानाच एकदा त्याची आणि **मॉरा** ह्या एका सरकारी अधिकाऱ्याच्या पत्नीची ओळख झाली. तो वारंवार त्याच ठिकाणी पोहायला जाऊ लागला. त्याच्या ध्यानी आले की, तिचे लग्न फारसे सुखाचे ठरले नव्हते. एकदा पोहताना नेमका तो ज्या माणसाने त्याला नोकरीला ठेवले त्याच्याच समोर आला. त्या अधिकाऱ्याने त्याला ताणले आणि दुसऱ्या दिवशी आपल्या कार्यालयात बोलावले. तो मॉराला म्हणाला ‘‘माझी नोकरी तात्पुरती होती. आता संपली नोकरी आमची!’’ तिचा चेहरा पांढरा पडला. ती त्याला म्हणाली, ‘‘चूक माझीच आहे. पण मला तुमच्या-साठी काही करता येईल. माझा नवरा आज रात्री बैठकीला जाणार आहे. तुम्ही घरी या. सावधगिरीने या. आपण काय ते ठरवू.’’

एरॉल तिच्या सूचनेनुसार सावधानपणे तिच्या घरी गेला. पण त्या ठिकाणी त्याच्या नोकरीसंबंधी कसलीही चर्चा झाली नाही. त्या रात्रीच्या अनुभवाबद्दल तो म्हणतो, ‘‘माझ्या आयुष्यातील एक अपूर्व, सुखद रात्र!’’

पण शुद्ध हरपली आणि मॉराचा नवरा घरी परतला. आणि भयंकर संतापाने एरॉलच्या अंगावर धावून आला. दोघांची खूप मारामारी झाली. एके क्षणी संधी साधून एरॉलने त्याला दोन जोराचे दणके दिले. तो थकून खाली पडला. त्यानंतर एरॉलने धांवत जाऊन मॉराला उचलून घेतले. तिचे भान हरपले होते. पण मग तिचा नवरा उठून जवळ आला. त्या दोघानी मिळून मॉराला शुद्धीवर आणले. एरॉल परत फिरला. एरॉल दुसऱ्या दिवशी त्याच्या अधिकाऱ्यापुढे जाऊन उभा राहिला. त्याची नौकरी संपली होती. मॉरा दवा-

खान्यात होती व तिचा नवरा जबडा फाटल्याने दवाखान्यात गेला होता." हे सारे सांगून झाल्यावरही त्या अधिकाऱ्याने चांगल्या वर्तनाच्या हमीवर त्याला कामावर ठेवून घेतले. त्याची बदली झाली तेव्हा त्याला सांगण्यात आले, "'मॉराचा निरोप घ्यायला जाऊ नकोस. तिचा नवरा तुला गोळी घालील"

**संघर्ष...**

न्यू गिनीच्या एका घनदाट जंगलात काम करीत असताना एका भयानक मानवहत्येचा अनुभव आला. त्या अत्याचारी टोळ्यांची धाड आली तेव्हा एरॉलचे कनाका कामगार त्याला बोलवायला आले. त्याने आपलं रिव्हॉल्व्हर घेतलं. तो निघाला पण ते दृश्य पाहून तो हादरला. टोळी निघून पुढे गेली होती. एरॉल झाडावर चढून बसला. रिव्हॉल्व्हर हातात धरून ठेवले होते. तो ज्या झाडाखाली लपला होता, त्या जवळच्या झुडुपात एक अतिशय थकली भेदरलेली स्त्री त्याला दिसली. एरॉल दिसताच तिला धीर आला. बरोबरच्या कामगारांना त्याने सांगितले कीं, हिला आपल्या क्वार्टर्सवर घेऊन जा. तिचे नाव होते **"मैहियाटो."** तिला त्याने घरकाम दिले. पण तिच्या सौंदर्याने तो भारावून गेला होता. त्याच्या मनात आणि विवेकबुद्धीत संघर्ष सुरू झाला. पण विवेकबुद्धि हरली. मनात एक प्रकारची अपराधी भावना होती. पण "अनुभव मात्र आनंदमय होता" असे तो म्हणतो. दुसऱ्या कुणाही स्त्रीशी तो बोलला तर मात्र एखाद्या सुशिक्षित, सुसंस्कृत, स्त्रीप्रमाणे तीही संतापाने लाल होत असे.

**जलचर एरॉल**

'न्यू गिनीमध्ये राहून त्याने **'मास्की'** नावाची बोट विकत घेतली. त्या बोटीच्या संदर्भातच त्याची व **जोएल स्वार्टझ** याची ओळख झाली. त्याला काही रंगीत छायाचित्रे घ्यायची होती. चित्रपटांसाठी! (निदान त्याने प्रारंभी तसे सांगितले) त्याला घेऊन एरॉल **सेपिक** नदीच्या पात्रातून हिंडला. काही ठिकाणी त्याना फोटोऐवजी विषारी बाण वाटचाला आले. पुढे एरॉलला कळले कीं, ते फोटो हॉलिवुडसाठी नको असून इंग्लंड-अमेरिकेच्या कल्पनेने जपानच्या युद्धाचा त्या भागाला धोका होता. आणि त्याना तर त्या भागाचा अजिबात परिचय नव्हता. म्हणून त्याना ते फोटो हवे होते. त्याने एरॉलची पाण्यातल्या विविध क्रीडांची चित्रे काढली. सुसरीबरोबरच्या क्रीडाही त्यात होत्या.

**शिर सलामत तो-**

न्यू गिनीच्या जंगलांत बेकायदेशीररीत्या बर्डस् ऑफ पॅरडाईज्च्या शोधात हिंडणारा एरॉल व त्याचे सहा साथीदार ह्याना पकडण्यासाठी डच न्यू गिनीचा अधिकारी त्याच्या मागावर होता. त्याला ही बातमी लागताच त्याने **सेपिक** नदीच्या एका तीराला आपली बोट लावली. सेपिक पार करण्याची सोय नव्हती. खूप मोठमोठ्या मगरी त्यात होत्या आणि पात्रही फार विशाल होते.

त्याच्या सहकाऱ्यानी बांबूचा एक तराफा तयार केला. त्यावर त्याने पैसा, कॅमेरा, बंदूक, दुर्बीण, बर्डस् ऑफ पॅरडाइजची पिसे वगैरे ठेवली आणि सारी मंडळी निघाली. प्रवाहाबरोबर ती सारी जात होती. दुसऱ्या तीरावर पोहचणार तितक्यात एका मोठ्या खडकावर तो तराफा आदळला. सारी माणसे पाण्यात फेकली गेली. पोहत पोहत ती माणसे किनाऱ्याला लागली खरी, पण ज्यासाठी हा सारा अट्टाहास केला ती पिसे, कॅमेरा, बंदूक, पैसा सारे काही वाहून गेले. सर्वजण जमल्यावर डच न्यु गिनी मागे टाकून सारेजण ऑस्ट्रेलियन भूभागाकडे पुन्हा पोहत गेले. पोहत जाताना एरॉलच्या पायाला काही प्रचंड धूड जाणवले. युलू नावाचा एक चांगला सहकारी त्याच्या बरोबर होता. त्याची करुण किंकाळी एरॉलला ऐकू आली. दुसरे सहकारी ओरडले "पुक्फुक् (मगर)" युलू पाण्याच्या खाली खेचला गेला. एरॉलला पुन्हा तो कधीही दिसला नाही.

एरॉलच्या अंगावर जेमतेम बुश जॅकेट होते. पोटात काही नाही. जवळ पैसा नाही अंग पाण्याने निथळत होते. अशा स्थितीत तो आपल्या सहकाऱ्यांबरोबर लुथेरान मिशनमध्ये जाऊन राहिला. तो धर्म मानीत नव्हता. पण तेथे त्याना ब्रेड, काड्याच्या पेट्या, दूध व फळे मिळाली. तेथून ते **ऐटापे**च्या बंदराकडे जायला निघाले. तेथे राहणे हे धोक्याचे होते. अटक होण्याची शक्यता होती. म्हणून एरॉल **सालामुआ** बंदराकडे गेला.

**वकिली नको**

सालामुआला एका रात्री जंगली चाचांची अशीच धाड आली. ड्रम वाजू लागले. एरॉलने स्वसंरक्षणार्थ गोळीबार केला. त्यात एक जण मेला. न्यु गिनीच्या कायद्याप्रमाणे एरॉलला अटक करण्यात आली. परक्या ठिकाणी अटक. जामीन नाही अशा स्थितीत तो असताना **जॅक रीन** हा त्याचा एक मित्र भेटला. तो साक्ष द्यायला तयार झाला—वास्तविक त्याने काहीही पाहिले नव्हते. एरॉलने त्या काळात कायद्याची सारी पुस्तके वाचून काढली. स्वतःच वकिली करायचा निश्चय केला. कोर्टरुममध्ये खूप गर्दी झाली होती. स्वतःच्या वकिलीपेक्षाही **जॅकरीन**च्या साक्षीने एरॉल वांचला. नाहीतर खुनाच्या आरोपाखाली आजपर्यंत त्याला तुरुंगात खितपत पडावे लागले असते. आपण पुन्हा म्हणून स्वतःची वकिली करायची नाही असा निश्चय एरॉलने केला.

**उपास तापास**

त्यानंतरच्या काही दिवसात पोटात अन्न नाही. खिशात पैसा नाही. नौकरी धंदा नाही असे त्याने काढले. त्या काळात अक्षरशः त्याने उपास काढले. त्यात त्याला गणोरिया किंवा ब्लॅक पॉक्सचे दुखणे आले. बरेच महिने हॉस्पिटलमध्ये पडून उपचार करून घेणे भाग पडले. ट्रिटमेंट फारच त्रासदायक होती. त्यात डबल डोस घेतले तर लवकर बरे होता येईल अशी त्याची कल्पना झाली. त्याने घेतलेल्या डोसने चामडी जळून गेली. न्यु गिनीला योग्य तो उपचार होणार नाही ह्या कल्प-








**संपूर्ण विकसित झालेल्या कमलातील सुगंधी परागकण पिवून सुखकर झालेले हे वसंतवारे प्रभातकाली वहात आहेत. वसंत ऋतूत रात्रभर रतिक्रीडा करणाऱ्या सुंदर रमणीच्या मुखचंद्रावर आलेले स्वेदबिंदू पिवून हे आर्द्र झालेले आहेत. त्याच्या मुक्त विलोल केशकलापाना आपल्या लहरीवर झुलवून हे त्याना सुखवीत आहेत. त्याच्या वस्त्रात प्रवेश करून आणि त्यात कंप उत्पन्न करून हे वारे त्याना सुखवीत, रतिश्रमामुळे त्याना आलेली ग्लानी हरून नेत आहेत.**

**( अमरुशतक १२३ )**

"नेने सिडनेला परत जाण्याचे त्याने ठरविले. तेथे त्याला दीर्घकालीन उपचार करून घ्यावा लागला. त्या काळात त्याने डॉक्टरी सल्ल्याने दारू सोडली. सिडनेला असताना पुन्हा तो **निओमी डिक्सला** भेटला. दोघांच्याही मनातली पूर्वीचीच प्रेमभावना कायम होती. तिला तो वारंवार भेटला. पूर्वीच्या लग्नाच्या आश्वासनांचेही पुनरुच्चारण त्यानी केले.

## डोकेदुखी

१९२८–३१ ह्या काळात एरॉलने कम्युनिस्ट वाङमयाचा भरपूर अभ्यास केला. भाषणे द्यायची त्याला सवय होती. "आपण शिकलो असतो तर उत्तम कायदेपंडित झालो असतो." असं तो एके ठिकाणी म्हणतो. सिडने वाचनालयातून त्याने कार्ल मार्क्सचे वाङमय आणून वाचले. आणि त्या संबंधी लिहिताना तो म्हणतो "जगातल्या ज्या काही थोड्या लोकानी ती 'डोकेदुखी' वाचली असेल त्यातला मीही एक होतो. त्या काळात मार्क्स हे एकमेव उत्तर आहे अशी धारणा न्यु गिनीत पसरलेली होती. पाश्चिमात्य जगातही त्यावेळी अशी धारणा पसरत चालली होती. त्या काळात अशी एक म्हण रूढ होऊ पहात होती—"वयाच्या पंचविशीत जो कम्युनिस्ट नाही त्याला हृदय नसले पाहिजे. आणि पस्तीशीत जो कम्युनिस्ट राहू शकतो त्याला डोके नसले पाहिजे." ह्या म्हणीचा जनक स्वतः एरॉलच होता असे तो लिहितो.

त्या काळात त्याने एखाद्या कॉलेज विद्यार्थ्याप्रमाणे अभ्यास केला. आपले शिक्षण कमी पडते ही विषादाची जाणीव त्याला बोचत होती. भिन्न भिन्न संस्कृतीचा विचार मनाला अस्वस्थ करीत होता. स्वतः वाचून, मनन, चिंतन करून स्वतःचे ज्ञान वाढविण्याचा संकल्प त्याने केला. त्यातून एक आत्यंतिक जिद्द उत्पन्न झाली. पश्चिमेकडे जायचे, तेथे नाव, यश मिळवायचे. पश्चिम जिंकायची!! त्याभावनेने त्याने वडिलाना पत्र लिहिले कीं, "मी इंग्लंडला येऊ काय? मला तुम्ही केंब्रिजमध्ये घालाल? आजपर्यंत जे मी वागलो आहे त्यावरून ही अपेक्षा फार मोठी वाटावी. पण आपण त्यागपूर्वक हे धाडस करावे असे मात्र मला मनःपूर्वक वाटते! वडिलांच्या कर्तव्यभावनेने मी आपण करावे असे सुचवीत नाही. मी जो मार्ग स्वीकारला आहे तो कष्टप्रद असला तरी मी त्यात समाधान मानीन. येथे न्यू गिनीमध्ये मी इतकी माणसे पाहिली आहेत कीं, जी मला लंडनमध्ये वीस वर्षे राहूनही पहायला मिळाली नसती. मला संधी दिली तर मी एक उत्तम बॅरिस्टर होऊन दाखवीन!"

त्याने हे पत्र लिहिले तेव्हा त्याला कल्पनाही नव्हती कीं, त्याच्या आयुष्याचा बराचसा काळ पुढे कोर्टातच जाणार आहे. बॅरिस्टर म्हणून नव्हे तर आरोपी म्हणून!! त्याच्या वडिलानी त्याला बोलावले नाही आणि एरॉलही कधी केंब्रिजला जाऊ शकला नाही.

न्यू गिनीतून स्वतःच्याच हिंमतीवर तो बाहेर पडला. वारा दाखवील ती दिशा योग्य असे मानून निघणे येवढेच एक त्याच्या हातीं होते.

## देणं-घेणं...

सिडने येथे असताना त्याच्या आयुष्यात एक स्त्री आली. तिचे नाव **मॅज पार्कीज्**! ती स्त्री विवाहित होती. सुंदर होती. श्रीमंत होती. एरॉल उतरला होता त्या हॉटेलच्याच समोर त्यांची प्रथम भेट झाली. रस्त्याची दिशा विचारण्यासाठी ती त्याच्याजवळ आली. त्यातून बोलणे वाढले. स्नेह वाढला. तिने हॉटेलांची व क्लबांची बिले भरली. तिच्याबरोबर तो नृत्यगृहात गेला. जेवला. ती दोघे पोहायलाही एकत्र गेली. त्याच्या खिशात पैसे नव्हते. तो कंगाल होता तरीही ह्या स्त्रीने त्याला ते भासू दिले नाही. ती भारावून गेली होती. तिच्या मनाचा तिने निश्चय केला होता. फक्त काळ यायची ती वाट पहात होती. ती दोघे एकत्र आली. वारंवार एकत्र आली. पण तिची भूक अचाट होती. सुदृढ प्रकृतीचा आणि निरोगी असलेला फ्लिनही तेथे खचला, असे तो स्वतःच लिहितो. त्यातून निघाला वैताग. एक प्रकारची पोकळी उत्पन्न झाली. मनात सैतानाचे अधिराज्य सुरू झाले. त्या भरात त्याने मॅज पार्कीज्च्या टेबलावर ठेवलेली हिरे माणके, अंगठ्या, सोन्यारुप्याच्या साखळ्या पळविल्या. मॅज शांतपणे पलंगावर झोपली होती. "ती गोष्ट कृतघ्नपणाची होती पण ती करणे अगदी क्रमप्राप्त होते" असे तो म्हणतो. दागिन्यांची लूट करून तो पळाला. पण रस्त्याने पळाला कीं, संशय जागृत होतो लोकांच्या मनात अशी त्याची धारणा होती. त्याच्या निष्कांचन अवस्थेत त्याने ते कर्ज म्हणून घेतले होते असे तो म्हणतो.

सिडने बंदरात त्याच्या मागावर साध्या पोशाखात दोन शिपाई आले. बोट सुटणार होती. त्यानी एरॉलची झडती घेतली. पण झडतीत काही सापडले नाही. "मी त्यावेळी असा अभिनय केला कीं,

त्यामुळे त्याना हास्यास्पद झाल्यासारखे वाटावे. पण त्याना तसे वाटले नाही. त्यानी सर्व सामानाची कसून झडती घेतली. मोजे, बूट, कॅमेरा, दाढीचे सामान सारे काही त्यानी तपासले. दाढीचा ब्रश त्यानी तपासायला घेतला तेव्हा तो मुद्दाम मोठ्याने शिंकलाही. कॅमेऱ्याची तर संपूर्ण मोडतोड केली. तेव्हा तो भडकला. त्याने त्या दोघाना मारामारीचे आव्हान दिले. पण तसे घडले नाही. बोट सुटली. त्याने एक चोर म्हणून सिडने सोडले होते. मनात गुन्ह्याची भावना डाचत होती. पण जे घडले ते घडले होते. तो म्हणतो "ही फक्त एकच आणि पहिलीच अशी वेळ होती कीं, ज्यावेळी माझ्या कडून घेतलेल्या गोष्टीबद्दल स्त्रीने मोल चुकविले होते." त्यानंतर भरपूर पैसे मिळायला लागले तेव्हा ऑस्ट्रेलियातल्या आपल्या मित्रांकडून एरॉलने **मंजचा** शोध काढण्याचा व तिचे ते अल्पमुदतीचे कर्ज फेडण्याचा प्रयत्न केला. पण मंजचा शोध लागला नाही. त्यानंतर त्याने विहिरी खणण्याचे काम पत्करले. क्वीन्सलँडच्या आतल्या बाजूस डायमंड डाऊन्स येथे! पण चार महिने खपून व घाम गाळूनही पाणी लागलेच नाही!

## ऑलिंपिक रेकॉर्ड

एका मेंढपाळाकडे काम करीत असताना त्याच्या एका मुलीशी त्याचा संबंध आला. तिचे नाव होते **अॅलीन**! एक दिवस एरॉल आणि अॅलीन हे एकत्र असताना तिच्या बापाने दोघाना पकडले. तो बंदूक आणण्यासाठी शेजारच्या घरात शिरला तेवढ्यात एरॉलने अॅलीनचा निरोप घेतला. आणि तो विरुद्ध दिशेने, वेगाने पळाला. तो त्या पळण्याचे वर्णन करताना म्हणतो "मी तुफान वेगाने पळतच होतो. सर्व ऑलिंपिक रेकॉर्ड्स् मी मोडली होती. दुर्दैव इतकंच की, ते पहायला अधिकृत प्रतिनिधी मात्र नव्हता." साडेपाच दिवस तो चालत राहिला. पळत राहिला. बूट फाटले होते. पोटात अन्न नव्हते. पाणी नव्हते. पुढे त्याला एक, हॉटेल मालकाच्या मुलीने मागल्या दारातून त्याला अन्न पाणी दिले. एरॉलला फक्त काही आलिंगने देणेच शक्य होते. ती त्याने दिली!

## वाईटातला वाईट अनुभव

एरॉल न्यू गिनी सोडून इंग्लंडला निघाला. तेव्हा बोटीवरच त्याला एक मित्र भेटला. त्याचे नाव होते डॉ. गेरिट एच्. कोएटस्. त्यांचा स्नेह जुळला. दोघेजण **मकावला** उतरले. एरॉलला तिथे एक **टिंगलिंग** नावाची मुलगी भेटली. तिच्यामुळे तो जुगारी अड्ड्यात सांपडला. काही दिवस तो तेथेच रमला. त्या स्त्रीच्या संपूर्ण जाळ्यात तो सांपडला. डॉ. कोएटस् चिक्कू, व्यवहारी होता. त्यामुळे तो एरॉलबरोबर फारसा गुंतला नाही. निघायचे बरोबर हा त्या दोघांचा मात्र निश्चय होता. कोएट्सला एरॉलचे हे वागणे फारसे पसंत नव्हते. एरॉल मात्र **टिंगलिंग**मध्ये फारच रमला. ती दीर्घकाळ बाहेर गेली वा कुणाशी फार बोलली, वा कुणाकडे पाहून तिने प्रसन्न स्मित केले तरी त्याला हेवा वाटत असे. अगदी जुगारी मित्रांशी पुढील योजनांबद्दल ती बोलली तरीही त्याला ते सहन होत नसे.

तिच्या सहवासात असतानाच एरॉलने आणखी एक धाडस करून पाहिले. अफू ओढून पाहण्याचे!! नवे नवे अनुभव कधीही न नाकारण्याचे त्याचे धोरण होते. तो त्याचा स्वभाव होता! त्याने अफू ओढून पाहिली. आणि त्याच्या मनापुढे भीतीचे थैमान सुरू झाले. अनेक चमत्कार पुढे दिसू लागले. नाचू लागले. "मी कोचावर पडून होतो. माझ्या डोक्यावरच कुठेतरी जणु दुसरा एरॉल लटकत होता. मी जे जे करीत होतो ते ते, सारे तो पहात होता. अशी एक आगळीच जाणीव मला खाऊन टाकत होती" असं तो त्या मन:स्थितीचं वर्णन करतो. टिंगलिंगशी त्याने अशा विविध प्रकारच्या प्रणयचेष्टा केल्या कीं, त्या आपण आयुष्यात कधी करू शकू असे त्यास वाटले नव्हते. दुसऱ्या दिवशी डॉ. कोएटस् एरॉलला भेटला. चल, निघू या" तो

म्हणाला. एरॉलजवळचे पैसे संपले होते. "दैव परत खेंचून आणू" तो म्हणाला. कोएट्स म्हणाला, "नाद सोड!" पण एरॉल हट्टाला पेटला होता. तो टिंगलिंगच्या शोधात गेला. हॉटेलच्या कारकुनाने सांगितले कीं, "ती निघून गेली आहे." एरॉल धावत तिच्या खोलीकडे गेला खोलीला कुलूप होते. तो परत टेबलापाशी आला. त्याला कळले की ती सकाळच्या बोटीनं—

"अशक्य! मला सांगितल्याशिवाय ती–" पण अखेर ती गेली होती. पाच हजारांची जबर टांग त्याला मारून ती निघून गेली होती. एरॉलने डॉ. कोएटस्‌ची भेट घेतली. त्याला सारी परिस्थिति समजावून सांगितली. "तू तर फार हुशार आहेस. असा कसा बनलास?" म्हणून डॉ. कोएटस्‌ने त्याला एकदम सरळ प्रश्न केला. "तुझी ती चिनी मैत्रीण कोण होती अशी तुझी कल्पना आहे? "ती हाँगकाँग मकावच्या दररोज खेपा करते. तुझ्या-माझ्यासारखी गिऱ्हाइकं गाठते. पैसा उकळते. हा तिचा धंदाच आहे." एरॉलचा विश्वास बसला नाही. पण ते सत्य होते. हृदय खचवून टाकणारा, वाईटातला वाईट अनुभव" असं एरॉल म्हणतो.

## अजब युक्ती

मकावमधून बाहेर पडताना एरॉलने चोरलेले हिरे माणके व सोन्याचे दागिने कुणीतरी पळवले. "जगातला अप्रामाणिकपणा फार वाढलाय्" असं तो संतापाने म्हणाला. हाँगकाँगच्या औद्योगिक विभागातून जात असताना "इंग्लंड आणि चीनला तुम्ही हवे आहात" अशा मजकुराचा फलक त्याला दिसला. दोघेही रॉयल हाँगकाँग व्हालंटीयर्सच्या भरती-केंद्रात दाखल होतात. जपानच्या स्वारीची भीति होती. त्याना बंदुका देण्यात आल्या ते दोघे सैनिक झाले. त्या दोघानी खंदक खणले. बर्फ उकरले, खाण्यारहाण्याचे भयंकर हाल झाले तेव्हा त्या दोघानी तेथून पळून जाण्याचा निश्चय केला. पण शांघाय प्रांताचे परमिट नव्हते. एरॉलने लाँड्रीच्या पावत्यांचा मोठा डोकेबाज उपयोग केला. आणि दोघेही तेथून निसटले.

## निरोप

कोलंबोकडे जाण्यापूर्वीच **मायाको** नावाच्या जपानी मुलीशी–विवाहित स्त्रीशी एरॉलचा संबंध येतो. ती सुंदर इंग्रजी बोलते. त्यांचा सहवास घडतो. तिच्या नवऱ्याला त्याची कल्पना नसते. पण बोटीवरच त्यांचे हे संबंध उघडकीस येतात. तिचा नवरा संतापाने एरॉलच्या अंगावर धावून जातो. गळा दाबतो. एरॉलपेक्षाहि तो सशक्त असतो. संतापाने वेडा झालेला असतो. अखेर एरॉलने स्वत:ची सुटका करून घेतली आणि तो म्हणाला, "तुझ्या पत्नीचा तुला संशय येतोय्? तुझ्या? तिने काही वाईट कृत्य केले असेल अशी तुझी समजूत आहे?" तो चक्क खोटे बोलत होता. पण त्यामुळे त्या माणसाचा नूर बदलला. तो केबिनचे दार लोटून "बघशील तू ?" असे म्हणत आत गेला. त्या दोघाना (डॉ. कोएटस् व एरॉल) कोलंबो येथे उतरून देण्यात आले. उतरताना एरॉलने मायकोचा निरोप घेतला तिच्या नवऱ्यादेखत!!

[क्रमशः]



# मी आणि संगीत

—वि. रा. भाटकर

**'रात्री अकराच्या सुमारास मी बावळट नाही, ही गोष्ट नंदूनं (म्हणजे आमची सौ.) कबूल केली ....' तुमची बायको संगीत शिकते आहे का? मग तीहि तुमची संभावना 'बावळट' या खाशा विशेषणात नक्कीच करत असणार! कारण त्या संगीतातलं काहीहि कळणं तुम्हाला अशक्यच. अशा समस्त नवरे-मंडळींसाठी हा जालीम रामबाण!**

**माझे** आणि संगीताचे जन्मापासूनच पटत नाही. गवयाचे पोर रडतेसुद्धा सुरात असे म्हणतात. गवयाचेच काय, कुणाचेहि पोर रडू लागले तरी त्याला काहीतरी ताल, सूर असतो. एका विशिष्ट सुरात आणि तालात ते गात असते. पण माझे मात्र तसे नव्हते. मी रडण्यास सुरुवात करताना म्याँ ऽऽऽ अशी एकदम पांढरी आठ किंवा नऊमध्ये सुरुवात करून मग लगेच वाँ ऽ वाँ ऽ वाँ ऽऽऽऽऽऽ असा काळी दोनमध्ये सूर काढून पुन्हा भाँऽऽऽऽऽ करून पांढरी सहा किंवा सातमध्ये जाऊन पुन्हा यँऽ यँ ऽ यँ ऽ करून पांढरी दोन आणि काळी एक यांच्या मधील फटीत उतरत असे.

जी गोष्ट सुराची तीच तालाची. पहिला सूर सोळा मात्रांचा तर दुसरा सूर बारा मात्रांचा. तिसरा दहा मात्रांचा तर चवथा आठ मात्रांचा आणि पाचवा पुन्हा सहा मात्रांचा— म्हणजेच त्रिताल, एकताल, झपताल, केरवा आणि दादरा असा एकाच बैठकीत मी एकूण पाच तालात रडत असे. कधी कधी मधूनच आठ मात्रांचा कीर्तन-स्पेशल धुमाळीत सूर काढीत असे. एकूण रडणे बेतालात होत असे.

माझ्या मनात संगीताविषयी नावड पक्की होण्याचे दुसरे कारण म्हणजे लहानपणापासूनच आई, ताई आणि इतर साळकाया-म्हाळकाया यांच्या घरगुती संगीताने मी बेचैन होऊन जात असे. मला उचलून घेणारी, खेळवणारी, फिरवणारी, झोपवणारी कुठलीहि बया थोबाड मिटून तसे करीत नसे. सारे काही संगीतात चाले. सकाळी उठताच —

"उतला लेऽ उतला। बंडू माजा उतला ऽ।।
हंशला लेऽ हंशला। गोटू माजा हंशलाऽ।।

या कवनाने सुरुवात होई. ते ऐकून कुठून झक मारली आणि उठलो आणि हसलो असे मला होई आणि मी लगेच म्याँऽऽऽऽऽ अशी पांढरी आठ किंवा नऊमध्ये सुरुवात करी. लगेच—

"अलेलेले अलेलेले, काय झ्यालं काय झ्यालं।
माज्या बंडूला काय झ्यालं। उगी उगी उगीऽ।।
माज्या गोटूला काय झ्यालं। उगी उगी उगी ऽ।।

हे सुरू होई. म्हणजे आता हसावं तरी गाणं, रडावं तरी गाणं, त्यावेळी अर्थात हसणं आणि रडणं याखेरीज दुसरं काहीच मला येत नसे. म्हणून मी पुन्हा हसू लागे. लगेच "हंशला ले ऽ हंशला। बंडू माजा हंशला।।" हे चालू होई. नंतर दूध पिताना —

"ये गऽ तू गाई गोठ्यातुनी ऽ।
बंडूला दुदु दे वाटीतुनी ऽऽ।।

हे चालू होई. आता 'बंडूला दुदु दे' हे ठीक आहे हो. पण गाई तू गोठ्यातुनी 'ये' कशाला? गोठ्यात आहे ती काय वाईट आहे? आणि समज गाय ये म्हणताच खरोखरच आली आणि तिने दुदु देण्याऐवजी तुला किंवा बंडूला किंवा तुम्हा दोघानांही शिंगावर घेऊन गटारात फेकून दिलं म्हणजे?

अंघोळ करताना —

"हमामा ऽ कलतो ले हमामाऽ कलतो।
शोनू माजा हमामाऽ कलतो।।
शोनूच्या डोल्यात शाबू गेला।
शोनू माजा ललायला लागला।।





अनुक्रमणिका

हे कवन ऐकावे लागे. शोनूच्या डोळ्यात साबू वगैरे काही गेलेला नसे. पण आंघोळ करताना शोनूला हसण्यापेक्षा रडण्याने जास्त बरे वाटत असे म्हणून शोनू रडत असे एवढेच.

तात्पर्य, कुठलीहि गोष्ट करताना मला संगीत ऐकावे लागे. झोपताना सुद्धा —

"अंगाई मंगाईऽऽ, सीतेचं सांडल ऽ काही ऽऽ।
शोधीते वेवीताई ऽऽ वाघन ऽ खेऽऽऽ ।।

हे कवन ऐकावे लागे. आता सीतेचं काही सांडलं तर त्याला 'मी' काय करू ? 'लॉस्ट अ‍ॅन्ड फाऊंड' डिपार्टमेंटला कळवायचं सोडून 'माझ्या' टाळक्याजवळ कटकट कशाला हो ? आणि वेवीताई जांभळाच्या झाडाखाली पडलेली जांभळं शोधायची ते सोडून वाघनख कशाला बुवा शोधतेय् ? अफजलखानाच्या पोटात खुपसायची आहेत की काय पुन्हा ?

थोडक्यात काय ? तर झोपताना सुद्धा अंगाई-मंगाई. उभा राहू लागलो तेव्हा —

"बंडू उबा ऱ्हायला, आमी नाय पायला।
शोनू उबा ऱ्हायला, आमी नाय बगितला ।।

हे चालू होई. नाय पायला तर पहा की डोळे फाडफाडून ! रडतेस कशाला खालीपिली 'नाय पायला', 'नाय पायला' करून ? त्याला काय तिकीट थोडंच लावलं आहे ? चालू लागलो तेव्हा —

"च्याल च्याल कलतो ले च्याल् च्याल् कलतो
बंडू माजा च्याल च्याल कलतो ।।

हे ऐकावे लागे. म्हणजे फक्त शिंक आली तर 'सत्यंजय' एवढेच म्हणावयाचे, एरवी काही केले तर गाणे म्हणावयाचे ही गोष्ट लक्षात घेतलीत तर संगीताविषयी माझ्या मस्तकात तिडीक कां निर्माण झाली ते तुमच्या लक्षात येईल.

शाळेतसुद्धा संगीताच्या 'कविता' या प्रकाराने मला थोडाबहुत त्रास दिला. मात्र मला कविता कधी 'म्हणावी' लागत नसे. एकदा आमच्या मराठीच्या राणे सरानी मला कविता म्हणायला सांगितली ती मी इतकी बेसूर आणि भेसूर म्हटली की त्यानी मला ती पुरती म्हणू दिली नाही आणि त्यानंतर पुन्हा कधी मला कविता म्हणायला सांगितली नाही.



शिऱ्यात 'लोखंडी' कीस आहे वाटतं ?

यानंतर संगीताने माझ्या मनाला जबरदस्त धक्का दिला लग्नानंतर. एकदा संध्याकाळी कामावरून परत आलो तेव्हा सुनंदाने मला एक जीवघेणी बातमी सांगितली:—

"मी किनई गाण्याच्या क्लासमध्ये नाव घातलंय् गडे."

"काय म्हणालीस ?????"

"इश्श ! एवढं दचकायला काय झालं बाई ?"

दचकायला काय झालं बाई ! म्हणजे जणू काही झालच नाही अशा आविर्भावात ती बोलत होती. नाही म्हणजे 'किनई' आणि 'गडे' हे ठीक आहे हो. एकदम पसंत आहे. पण गाण्याच्या क्लासला नाव कशाला गडे ? व्हॉट् ?

"हे बघ नंदू, —

"काऽही सांगू नका मला. सगळं समजलं मला. एऽवढीसुद्धा हौस पुरवू नका माझी. सारी पांऽच रुपये तर फी आहे सबंध महिन्याची. तीन महिन्यांची एऽकदम भरली तर फक्त बारा रुपये."
(काळी दोनमध्ये हुंदका.)

"हे बघ, नंदू, पाच नाही, तू पन्नास रुपये भरून पोहण्याच्या, इंग्रजीच्या नाहीतर दुसऱ्या कसल्या तरी क्लासला जा, पण गाण्याच्या क्लासला जाऊ नकोस. प्लीज !"

"काऽही सांगू नका मला म्हणून सांगितल ना तुम्हाला ? सगळं समजलय् मला." (काळी चारमध्ये हुंदका.)

या हुंदक्यापेक्षा गाणे बरे असा विचार करून मी म्हणालो, "बरं बुवा. जा गाण्याच्या क्लासला. मग तर झालं ?

ते ऐकताच नंदू आधी पांढरी एक, मग काळी दोन, मग पांढरी पाच आणि शेवटी पांढरी आठमध्ये हसू लागली. मी कसाबसा रडे आवरण्याचा प्रयत्न करीत होतो. हसण्याचा भर ओसरल्यावर नंदू म्हणाली,

"मग पेटी आणायची ना गडे ?"

पेटी !! अरे देवा !!!

"पेटी ? म्हणजे बाजाची ना ?" मी विचारले.

"अय्या ! म्हंजे तुम्हाला काय वाटलं, कचऱ्याची ऽ?" नंदू म्हणाली आणि आपल्याच विनोदावर निहायत खूष होऊन पांढरी एकवीसमध्ये हसू लागली.

नंदूने आयुष्यात प्रथमच केलेला मस्तपैकी विनोद ऐकून मलाहि हसावेसे वाटत होते, पण एवढेच नव्हे तर तिचे एक गोडसे—, पण पेटी आणण्यासारखा गहन आणि महत्वाचा विषय चालू असल्यामुळे मी तसला काही आचरटपणा केला नाही आणि पेटी आणावी लागू नये यासाठी काही प्रयत्न करता आला तर पाहू लागलो.

"पण पेटी कशासाठी ?" कशासाठी ते माहीत असूनहि मी विचारले.



अनुक्रमणिका

"इश्श् ! गाणं शिकायचं म्हणजे पेटी नको का आणायला?" नंदू म्हणाली.

नको म्हणालो तर पुन्हा काळी दोन आणि काळी चारमध्ये हुंदके सुरू होतील हे मला माहीत होतं. मी पेटी आणण्याच्या कल्पनेला संमति दिली आणि त्यासाठी रु. ३००।– मंजूर केले.

गाणे आणि पेटी शिकायला लागल्यानंतर सुमारे तीन आठवड्यानी सुनंदाने 'गाणं शिकताना त्यावरोबरच तबलाहि शिकावा लागतो' हे मला समजावून सांगितले. तिने तबला 'आणायला' सांगितला नाही, पण पेटीवरच ती ताल धरू लागली आणि तोंडाने 'धा धिं धिं गा तिड तिड गिड गिड धिंगा' असे काहीतरी बडबडू लागली. हा धांगडधिंगा कशासाठी मला समजेना. पेटीच्या सुरांचा कर्कशपणा कमी होण्यासाठी तो असेल अशी मी स्वतःची समजूत करून घेतली.

"तुम्ही तबला शिकायला लागा आता," एक दिवस सुनंदा मला म्हणाली.

"तबलं ?" मी दचकूनच विचारले.

"हो, हो, तबला त–ब–ला. तव्यातला त, बंबातला ब आणि लाडवातला ला. त – ब – ला. तुम्ही काय ऐकलंत ?"

"नाही, तबलाच ऐकलं मी पण —"

"आलं का तुमचं पण ?"

"तसं नाही ग, पण त्या धांगडधिंग्यात आपल्याला तर बुवा काही जमेल असं वाटत नाही."

"अहो एकदम कसं जमेल ? मला तरी सुरुवातीला पेटी वाजवणं कुठे जमत होतं ?"

"अजून तरी कुठे जमतंय् ?" (हे अर्थात मनातल्या मनात)

मग तिने पेटीवर एक गाणं वाजवलं आणि कुठलं गाणं ते मला ओळखायला सांगितलं.

"ये ये ताई पहा पहा ?"

"इश्श !" नंदू म्हणाली, "म्हणजे मराठी पहिलीतली कविता का वाजवतेय् मी ?"

"रमला कुठे ग कान्हा ?"

"इश्श ! इतकं जुनं गाणं का वाजवणार मी ?"

बरं बुवा ! नवं तर नवं !

"तोच चंद्रमा नभात ?"

"चल्ला ! अगदी बावळटच आहात तुम्ही !"

ऐकलंत ? म्हणजे 'ती' काय वाजवते ते मला ओळखता येत नाही म्हणून 'मी' बावळट !

"कबूल करा हरलो म्हणून," नंदू म्हणाली.

"आता हरलो म्हणालो ना."

"तसं नाही. हरलो असं 'कबूल' करा " नंदू म्हणाली.

"यापुढे, बरं बुवा, हरलो असं कबूल करतो !" असं सगळं साग्रसंगीत म्हणावं लागतं. (यात पुन्हा संगीत आलंच, बरं का) म्हणजे कबूल हा शब्द तोंडाने उच्चारावा लागतो.

## काही वात्रटिका

एक होता वेडा
त्याला दिसला एक रेडा
वेड्याने केला नमस्कार
नि रेड्याने केला शिंगाने सत्कार

☆ ☆ ☆

एक होता सरडा
त्याने धरला एकदा एका पालीचा नरडा
तेव्हा तिने केला आरडा-ओरडा
नि फोडला जोराने हंबरडा
तेव्हा धावून आला पालीचा पठ्ठा
पण सरड्याने केला दोघांचा चट्टामट्टा

☆ ☆ ☆

एक होती मराठा नार
तिचा होता एक म्हातारा यार
तिच्यावर होते त्याचे प्रेम
मात्र ती खेळीतसे त्याच्याशी 'गेम'
एकदा तिला तो म्हणाला—
"आपण साजरा करू हनीमून"
तेव्हा ती उत्तरली—
"लौकरच म्या व्हणार आहे की तुझी सून"

—श. शि. पेंढारकर

मी हरल्याचे 'कबूल' केले.

"अहो, माणुसकीच्या शत्रूसंगे युद्ध आमुचे सुरू" हे गाणं वाजवलं मी.

अस्सं होय ? मग वाजविण्या 'पूर्वी'च तसं सांगितलं असतंस तर काय मेली असतीस ? आता तुम्हीच सांगा, वाचकहो, पँपँपँपँऽपँ पँपँपँपँपँपँ पँपँपँपँपँऽऽ यात मला काय समजणार, बोडकं माझं ?

"बरं आता दुसरं गाणं वाजवते हं," नंदू म्हणाली, "हिंदी वाजवू का ?"

हिंदी वाजव नाहीतर गुजराथी वाजव. आपल्याला काय, एम् न एम्च् छे !

"हं, वाजव !" मी उघड म्हणालो. पुन्हा तिने पँ पँ पँ पँ पँ पँ पँ पँ पँ पँऽपँऽपँऽ,पँऽ पँऽऽ,पँऽपँऽपँऽऽ असे वाजवले. आता यांत काय ओळखायचं हो ? नुसतं पोपटाचं किंचाळणं ! पँऽपँऽपँऽपँऽपँऽ ऽऽ !



अनुक्रमणिका



## स्त्रिया व क्रिकेट :

**ऑस्ट्रेलियाचा द्रुतगति गोलंदाज 'लिंडवॉल' याची दास्तान वेगळीच. त्याच्या काळात, त्या तोडीचा व गतीचा शीघ्रगति गोलंदाज जगात नव्हता. वयोमानाप्रमाणे त्याचा वेग कमी झाला. वास्तविक त्याचा प्रभाव कमी झाला होता हे इतरांच्या (व त्याच्याहि) लक्षात आले होते. परंतु त्याच्या बायकोने त्याच्या मागे भुण भुण लावली 'गडे, तुम्ही जागतिक विक्रम करा ना!' (मूळ संवाद इंग्रजीमधून) आणि मग त्यासाठी तिने त्याला सकाळी उठून पळायला लावले, त्याची प्रिय मदिरा–तिलाहि सोडणे भाग पडले. व शेवटी १९५९–६० मध्ये हिंदुस्थानच्या दौऱ्यावर स्वारी आली आणि अपयशी होऊन, विक्रम न करता, बेगसारख्या नव्या पोरांकडून फोडून घेऊन परत गेली. तो घरी गेल्यानंतर घरी काय काय घडले हे अद्याप कळले नाही!**

"हल्लो मिस्टर हाहु डु यु डू ?" मी नेहमी सीलोनवर ऐकू येणारी एक ओळ सुचविली.

नाही ? मग "मिस्टर जॉन, बाब्बा जॉन, याला मिस्टर खाऽऽऽन?"

बरं मग "चली गोरी पीके मिलनको चली ?"

"ए वांबू ऽ, बांबुराऽक ?"

हं, ओळखलं, "जरुरत है, जरुरत है, श्रीमती की, कलावतीकी, स्वयंपाकिणबाई की, मोलकरणीकी ?"

"नाहीच मुळी," नंदू हसून म्हणाली. "आणि त्या गाण्यात स्वयंपाकिणीकी आणि मोलकरणीकी हे शब्द नाहीतच मुळी. तुम्ही पदरचेच घुसडले आहेत आपल्या."

आतापर्यंत माझा हिंदी गाण्याचा स्टॉक संपला होता. नंदूने 'बावळऽट' म्हणण्यापूर्वीच मी बावळटासारखा चेहरा केला आणि हरल्याचे कबूल केले.

"नंदू पुन्हा एकदा विजयी मुद्रेने हसली आणि म्हणाली, "अहो सबको छोडकर आऽजाऽवोऽ, आऽजाऽवो, आऽजाऽवोऽ, हे गाणं वाजवलं मी."

आता आणखी पोपटाचं किंचाळणं नको म्हणून मी म्हणालो, "आता पेटी पुरे झाली. तू नुसतंच एक गाणं म्हण. आऽ आऽऽ आऽऽऽ नको हं ! भावगीत म्हण एक छानपैकी."

गाण्यात 'भावगीत' हा प्रकार मला 'त्यातल्या त्यात' आवडतो, वरं का.

"इश्श !" नंदू हसून म्हणाली. "अगदी वेडपटच आहात बाई तुम्ही ! क्लासिकल गाणारी माणसं फडतूस भावगीतं म्हणतात का कधी ?"

काय बोलणार मी आता ? कपाळ ?

"अग पण म्हटलं म्हणून जगबुड का होते ?" च्यायला! त्यात कसला बुवा कमीपणा ?"

"इश्श ! अहो तुम्ही केमिस्ट आहात. तुम्हाला झाडू घेऊन केर काढायला सांगितलं तर त्यात कमीपणा नाही वाटणार ?"

"छट् !" मी म्हणालो "त्यात कमीपणा कसला बुवा? महात्मा गांधींनी नाही का–"

"मरू दे हो ते तत्त्वज्ञान," नंदू म्हणाली. "तुम्ही एक जगा-वेगळे असाल, म्हणून सगळीच माणसं —"

"अग पण क्लासिकल गाणाऱ्या माणसाने एकाद्या वेळी म्हटलं एखादं भावगीत कुणी आग्रह केला म्हणून —"

"इश्श !" नंदू साभिनय म्हणाली, "अगदी बाऽवळटच आहात बाई तुम्ही !"

आता मात्र माझी सहनशक्ति संपली. नाही, म्हणजे, तुम्हीच सांगा, बावळट तरी किती वेळा म्हणून घ्यायचं ? आणि कां ?

"काय म्हणालीस ? बावळट ?" मी विचारले.

"हो, हो. बावळट." नंदू म्हणाली.

"पुन्हा बोल !" मी.

"बावळट, बावळट, बावळट," नंदू म्हणाली." बा–व–ळ–ट. बांगडीतला बा, वरवंटचातला व, उसळीतला ळ आणि टमरेलातला ट. बा – व – ळ – ट."

मी उठलो आणि काही न बोलता दिवा मालवला.

रात्री अकराच्या सुमाराला नंदूने मी बावळट नाही ही गोष्ट कबूल केली. मग 'अगदी अगदी दुष्ट आहात तुम्ही !' असे म्हणून ती कुशीवर वळून झोपी गेली.

मी सुद्धा मग बावळट असणं चांगलं की दुष्ट असणं चांगलं याचा थोडा वेळ विचार केला आणि शेवटी बावळट असण्यापेक्षा दुष्ट असणंच चांगलं असा निष्कर्ष काढून निद्रादेवीच्या आहारी गेलो.

रात्रभर मला स्वप्ने पडत होती. प्रत्येक स्वप्नात पिंजऱ्यात कोंडलेला एक पोपट सारखा पॅऽपॅऽ पॅऽ पॅं ऽ पॅंऽ करून ओरडत होता, किंचाळत होता ....

बिचारा !

•••







अनुक्रमणिका

# नव्या वर्षाचा नवा उन्मेष!

घेऊन जानेवारी १९६७

# दीपावली

मूल्य १ रु.

नव्या वर्षात प्रवेश करणार

## ही झलकच पहा........

**'आम्ही असे लिहितो'** या गेले वर्षभर गाजत असलेल्या मालिकेतील शेवटची मुलाखत—**कविवर्य बा. भ. बोरकर** ● **'चिध्या'**—नवा आशय शोधणारी श्री. **सदानंद रेगे** यांची लघुकथा ● **'जन्नत'**—सुरेश वेंगुर्लेकर यांची एक मर्मभेदक कथा ● श्री. **पंढरीनाथ रेगे** यानी घडवलेले एक बेफाम विनोदी कुलदीपकाचे चित्रण ● **'बालकवि आणि रमाई'**—**मं. वा. धोंड** यानी टाकलेला आणखी एक प्रकाशझोत आणि **कीचक** या मूळ कन्नड भाषेतल्या एका हृदयस्पर्शी नाटिकेचा १ ला भाग—

आणि दीपमाला, सन्मानपुष्पे, ऐसी अक्षरे, रंगमंच, पानपुरी, असे ऐकले....वगैरे रंगतदार सदरांसह.

दिवाळी अंकातल्या वाचकांच्या स्पर्धेचा 'कौल' याच अंकात प्रसिध्द होणार म्हणून आपली प्रत आगाऊ राखून ठेवा.

# पारितोषिके मिळवा

रुपये १००, रु. ५० व रु. २५

## तुमचा 'कौल', तुमचेच 'भाग्य'

## — हे उभे आहेत —

'दीपावली'च्या दिवाळी अंकात 'हे उभे आहेत'
या शीर्षकाखाली एक कूपन दिले आहे. त्यात
दिवाळी अंकातील साहित्याबद्दल आपली मते मागितली आहेत.

## आपण ते कूपन भरून पाठवले काय ?

नसल्यास

**१० डिसेंबर १९६६ पर्यंत भरून पाठवा आणि पारितोषिके मिळवा.**








अनुक्रमणिका

[पर्व शेवटचे]

- माधव राजवाडे

# अंदमान ते आनंदमान

मराठी साहित्यातील प्रवासवर्णनात सर्व दृष्टीने वेगळी आणि कुतुहलजनक ठरणारी ही 'अंदमानाहून आनंदमाना'ला निघालेली लेखमाला प्रस्तुत अंकातल्या 'नंदनवना'पर्यंत येऊन ठेपली. प्रा. ना. सी. फडके, श्री. पु. भा. भावे, श्री. पु. ल. देशपांडे, श्री. अरविंद गोखले इ. मान्यवराना तर तिने नंदनवन येण्यापूर्वीच चटका लावला. मराठी वृत्तपत्रातहि या लेखमालेवर रसिक व स्वागतप्रिय प्रतिक्रिया प्रकटल्या. अशी लेखमाला छापण्याच्या बाबतीत दीपावलीने जो पुढाकार घेतला तो किती बरोबर होता हे सहर्ष नोंदवताना तो पुढाकार घेणे किती यथार्थ होता याची पावती ज्या वाचकानी दिली त्यांच्या डोळसपणाची व दीपावलीवरील लोभाची दखल घेणे अस्थानी ठरणार नाही.

म्हणून श्री. माधव राजवाडे यांचे त्यानी दिलेल्या सहकार्याबद्दल आम्ही मनःपूर्वक आभार मानतो. कारण त्यानी मनावर घेतले नसते तर हा सुयोगच आला नसता—संपादक

## भूतलावरचे एक नंदनवन

**अंदमान** निकोबार बेट—समुहात निसर्गाचा जो काही उल्हास आणि विलास दिवसा दिसावयाचा तो एकदम पडद्यातून बाहेर आलेल्या सुंदरीसारखा तनमनास देखताच खुलवणारा आणि सुखावणारा होता. वास्तविक 'होता' असा भूतकाळ वापरणे अप्रस्तुत होईल. कारण त्या वैविध्याने नटलेल्या निसर्गदर्शनातून जे नित्य नूतन निसर्ग-नर्तन तळपायचे ते एवढे चिरतरुण आहे कीं, अंदमानचे निसर्ग सौंदर्य सदा वर्तमान जाणवेल.

अंदमान येथील प्रकृतीच्या चारुत्वास यात्रा किंवा धर्माची चौकट नव्हती. ती तशी नव्हती म्हणून तेथील सुरेखपण, हे जसे जाती भेदातीत आहे तसेच अशाप आहे. सर्वव्यापी ईशाला आपला निरपेक्ष खेळ दाखवण्याची इच्छा झाली आणि भूतलावरील जागा पाहता पाहता त्याला ही बेटे दिसली. ती दिसताच आपली माया आणि करामत दाखवण्याचा मोह त्यालाहि आवरला नसावा. ईशाची कृपा लाभली आणि त्या कृपेनेच अजर मोहकपणाचे देणे बेटाना शृंगारून राहिले आहे. हे देणे आजच्या क्लांत—श्रांत मानवी मनाला सदैव जीवनावर प्रेम करावयास लावणारे लेणे कसे बनवावे? जे प्रकृतीतून उत्फुल्लतेने वर आले आणि प्रसन्नपणे झळाळू लागले त्याला हिऱ्याला शोभायमान ठरावे असे कोंदण? . . . . . . . . . .अंदमान तसे करावयाचे म्हणजे तसे संस्कार त्याला केवळ वरकरणी आकर्षक व प्रतिष्ठित करून चालण्यासारखे नव्हते. चार घटका सुखात घालवायला आलेल्या माणसास त्याची हालचाल, त्याचा विहार, त्याचा आहार, त्याचा मुक्तपणा आणि त्याचा चंडोलपणा ही अडखळू नये अशा सोयी आणि सवलती सहज साध्य करणे . . . . . . . . . .पर्यटकांचे केन्द्र या भूमिकेतून व हेतूने निर्माण केले होते. रस्ते सुधारले, वाहतूक विनायास असावी याची तरतूद केली, आगत—स्वागताचा काही क्रम, थोडी शिस्त निर्माण केली . . . . . .

आज जगात व आपल्या देशात उद्योग-व्यवसायाचे व राहणीचे एकंदर स्वरूप असे आहे कीं, मन सारखे कामात गुरफटत जाते. या गुरफटण्यातून व्यावहारिक लौकिकाचे आणि जीवन-कलहावर मात करण्याच्या व्यावसायिक कर्तृत्वाचे एकावर एक तंतु विणले जातात. ही वीण चालू असताना लक्षात येत नाही. पण अवस्था रेशमाच्या किडयासारखी होत असते. म्हणूनच या गुरफटण्याचा, मनावर व शरीरावर ताण पडत जातो. हा ताण तोच-तो-पणाचा, मानसिक संघर्षाचा, केव्हा केव्हा बुद्धिभेदाचा, आणि सारखा माणसाला बधीर करत जाणारा ठरतो. शहरात व आजच्या नागर आयुष्यक्रमात ज्या स्वस्त साहित्याला, सवंग करमणुकीच्या जागाना आणि जिव्हालौल्य पुरवणाऱ्या दिखाऊ उपहारगृहाना स्थान मिळाले आहे त्यावरून हेच विशेषतः दिसते. त्यातल्या-त्यात दर आठवड्याच्या शनिवार—रविवारी उद्याने आणि सिनेमा थिएटरे येथे जी बेसुमार व अनावर गर्दी दिसते त्यावरून हे जसे उत्कटतेनं व उग्रत्वानं लक्षात येते तसेच असे खटकते कीं, बहुतेक सारी माणसे त्या गर्दीत आपले हरपले श्रेयप्रेय दशदिशात शोधण्याच्या—मिळवण्याच्या धडपडीत आहेत आणि ते काही मिळत नाही या वैफल्याने सुट्टी संपली कीं, आपल्या कामावर जातात.... उसना आव आणून, ताण मूळात सैल न होता, स्नायू ऋजू न होता, संवेदना बधिर बनवून घेऊन . . . . . . . .याचाहि मग एके दिवशी उबग येतो. इक्बाल कवीप्रमाणे मन उद्गारते.

> 'उकता गया हूं यार
> दुनियाके महिफिलों से
> दिल घुंडता हे ऐसा सुकूत
> जिसपर तक्रीर भी फिदा हो'

[घाई, गर्दी आणि दगदगीच्या या दुनियेतील मेहफिलीना



अनुक्रमणिका







उबगलो आहे. मन अशा निरव शांततच्या शोधात आहे कीं, त्यावर क्षमोघ वाणीची रसवंतीहि लुब्ध व्हावी. बोलकेपण आणि सारं प्रकट करणारे बोलहि त्या शांततेच्या सजीवतेपुढे फिके पडावे असा ध्वनि आहे! ]

मग बदल लागतो. असा तसा नव्हे. स्थलाचा, उदय–अस्ताचा, संध्या प्रकाशाचा, पाण्याचा, खाण्याचा, हिंडण्याचा,—जगाच्या कलकलाटापासून, दगदगीपासून, गर्दीपासून, दूर दूर......त्याला विचार नको असतो, हेतु नको असतो. नियम नको असतो. क्रम नको असतो. योजना नको असते. हवी असते मोकळीक. लागते फक्त अनिरूद्ध श्वसन आणि मुक्त प्रदेशातले स्वातंत्र्य—तेहि संचाराचे, अनौपचारिक वागणुकीचे...... नेहमीपेक्षा वेगळे.......

ही क्षमता अंदमानात आहे. बेटावर पाऊल ठेवताच तेथील परिसर माणसाला आपलासा करणारा, तेथे हिंडू फिरू लागताच सगळे विसरावयास लावणारा...त्याला मंत्रमुग्ध करणारा. प्रसिद्ध नाटककार विद्याधर गोखले यानी आपल्या नव्या यशस्वी संगीत 'जय-जय गौरी शंकर' या नाटकात गोमंतभूमीबद्दल नारदाकरवी जे 'वैकुंठाची भाव मधुरता आणि इंद्रलोकाची सुंदरता याच गोमंतभूमीत एकवटली आहे! सह्यगिरीचा जटामुकुट धारण केलेल्या ह्या रम्य प्रदेशाला, साक्षात् महादेव मानूनच कीं काय, तीर्थराज सागर आपली सर्व संपदा याच्या चरणी अर्पण करीत आहे! गगनचुंबी ताल–नारिकेल वृक्ष ह्या पुण्यभूमीवर चामरं ढाळीत आहे. येथील कुंजा कुंजात संगीताचे सप्तसूर झंकारत आहेत! विधात्याची सारी रंग कला येथे बहरली आहे!' असं वदवले आहे ते यथार्थतेनं तंतोतंत अंदमान निकोबार बेटाना लागू पडतं....

काही ठिकाणं अशी असतात कीं, ती अंतरंगात किती सौंदर्यपूत आहेत हे पाहावयास दृष्टी लागते. ती सर्वानाच नसते. कवीला असते. रसिकाला प्राप्त होते. पण काही ठिकाणं अशी असतात की ती दृष्टी निर्माण करतात. रम्यत्वाची, दिव्यत्वाची प्रचीति देतात. 'दिव्यत्वाची जेथ प्रचिति तेथे कर माझे जुळती' या कवी बोरकरांच्या काव्यपंक्ति ओठावर थयथयतात अशा स्थलाना भेट देताच–पाहताच. अंदमान–निकोबार बेटात अशी रम्य स्थळे समृद्ध निसर्गाच्या कुशीत लाडिक चपखलपणाने बसलेली आहेत. कार्बिन्स कोव्हचा परिसर असा 'दिल' काबीज करणारा होय. तेथील सागरी किनारा व नारळीचे बनही "या सम अन्य नाही" असे म्हणावयास लावणारी. हत्तीना शिकवण्याचे मधुवन पाहिले कीं, जाणवावे पशूची शक्ति, माणसाची युक्ति आणि निसर्गाची भक्ति यांचा मेळच भूतलावर स्वर्ग निर्माण करेल. बाराटांग बेटातील गगनचुंबी गर्जनवृक्षांचे वन पाहून, कुणास आपल्या ध्येयासक्त जीवनात या गर्जनांचा आदर्श डोळ्यासमोर सतत ठेवावासा वाटल्यास नवल नाही. माणसाची बरीच स्फूर्तिस्थाने निसर्गातलीच असतात. शंभर शंभर फूट उंच गर्जनवृक्षांचे भव्य वन पाहून मन उत्तेजित होणारच. क्रिकसमधील जलपर्यटन अशाच थाटाचे



श्री. माधव राजवाडे

व ऐटीचे. वाटावे कीं, स्वर्गीच्या लोकाना अनिरूद्ध संचार करता यावा म्हणूनच ही बेटे मानवी संपर्कापासून देव लोकानी दूर व सहज प्राप्य ठरू नये अशी ठेवली असावी. बेटाना भेट दिल्यावेळेस योगायोगाने निकोबारी लोकांचे नौकायान, आणि नौका चढाओढ पाहावयास मिळाल्यास अहो भाग्यमच म्हणायचे. एवंच समुद्रकिनाऱ्यावर मनसोक्त हिंडिवे, मधुर शहाळी रिती करावी, वाटेत कुठेतरी भला मोठा मधाचा पोळ मोठ्या वृक्षावर दिसावा अन् त्यावर भरभर चढणारा आदिवासी पाहावा आणि तोंडातून उद्गार बाहेर पडावा 'आभाळाएवढी म्हैस, डोंगराएवढी कास, घार काढी ओंगीदास' आणि मधाची अवीट गोडी चाखावी, आदिवासींचे अनावृत्त आणि अकृत्रिम जीवन पाहावे, सागरी पाण्यातले नानारंगी मासे पाहून मच्छिमारी करण्याचा मोह व्हावा व मच्छिमारीत रस घ्यावा, नौकाविहारात तनमन रमावे व हरवावे, वनश्री आणि जलचर यांचे खेळ पाहावे, पाहत राहावे...हे सर्व करून कंटाळा येऊ नये, वृत्ति सतत उत्तेजित होत आहे असा अनुभव यावा, दिवस अपुरा वाटावा, दिवसाचे तास निर्दयतेनं भरभर सरकत असल्याचे जाणवावे, आयुष्य निसटते भासावे आणि उमर खय्यामला ते ओंजळी भरभरून अधीरतेने पिण्याची कां ओढ लागली होती याचे मर्म अशा रितीने आकळावे......... बंद झालेल्या जीवनाची कवाडे पटापट उघडताहेत आणि त्यातील अपार सौंदर्य किती अनंत आहे याचे दर्शन होऊन जीवनाचे 'अस्' (To be) प्रत्ययास यावे.......अशी जगण्याची ओढ व आसुस निर्माण व्हावी–भोगातून जीवन जगण्याची श्रद्धा बळकट व्हावी,–राजयोग म्हणतात त्याचे मूळ अशा श्रद्धेत व अशा दर्शनात आहे असा स्पर्श चित्तास व्हावा, व हे सुख निर्लेप, अवर्णनीय, व अतुल आहे हे सर्व अंगी जाणवावे.......असे करता करता मन तृप्त व्हावे.....कुठे तरी आडवे व्हावे, वात्सल्य









रस नोहे डोंगा, पण रस कोठे आहे ? तृष्णा

मानव निर्मिति मर्यादांचे भय राहू नये........ नि:संकोचपणे धरती-मातेच्या अंकावर पहुडावे———

—आणि, आणि अशा अवस्थेत झोपलेला पाहून कुणीहि उद्गार काढावा———'

**भूः पर्यङ्को निजभूजलता कंदुकं, खंवितानं**
**दीपश्चन्द्रो विरति वनिता लब्ध सङ्गप्रमोद ::।।**
**दिक्कान्ताभिः पवन चमरैर्वीज्य मानः समन्तात्**
**भिक्षुः शेते नृपइव भुवि त्यक्त सर्व स्पृहोऽयम ।।**

[भूमीचा पलंग केलेला आहे, दंडाची उशी केलेली आहे, व आकाशाची मच्छरदाणी लावलेली, विरक्तिरूपी रमणीला कुशीत घेतल्याचा आनंद मिळत आहे–दिग्वधू, वाऱ्याच्या चवऱ्या करून विझण वारीत आहे—अशा थाटात, साऱ्या इच्छा सोडून, हा भिक्षू एखाद्या राजासारखा निजला आहे. ]

—माणसाला ही अवस्था वांच्छनीय असते. ती इतकी अप्राप्य वाटते कीं स्वप्नमय व स्वर्गीयच आहे असे तो समजतो. उम्या हयातीत तो अनुभवू शकतो, सहज तसा अनुभव संभव व साध्य आहे असे कळले तर त्याचे क्षणाक्षणाने वाढणारे वैफल्य पाहता पाहता नाहीसे होते. कारण मनाची ही अविकल्प समाधी माणसाचे प्रेयस आहे. ते एकदा अनुभवाला आले कीं, सारी श्रेये फिकी पडतात. असं काही माणसाना हृषिकेशला गेल्यावर वाटतं तर काहीना काश्मीरला–श्रीनगरला भेट दिल्यावर वाटतं. मला जर विचारलं तर मी म्हणेन 'मी काश्मीर पाहिलं, उटी पाहिलं, कडाय कोनाल पाहिलं, दार्जिलिंग पाहिलं पण अंदमान ते अंदमान' कारण अंदमान हे वेगळं, प्रसन्न आणि मुख्यतः अधिक नावीन्यपूर्ण,–असं नावीन्य कीं जे जून व्हावयाचं साफ नाकारतं. या संदर्भात स्वातंत्र्यवीर सावरकरानी आपल्या 'जन्मठेप' या आपल्या पुस्तकात अंदमानबद्दल जे म्हटले ते उद्धृत करण्याचा मोह टाळता येण्यासारखा नाही—

'पूर्वेकडील हा अंदमान–निकोबार द्वीपपुंज म्हणजे हिंदुस्थानच्या पूर्व समुद्राची द्वारेच होत.' हे समुद्राचे द्वार स्वातंत्र्यवीरानी त्याकाळी सूचित केल्याप्रमाणे भारतीय सत्तेखाली आले, विमान वाहतूक सुरू झाली आणि जगाला आपल्या अनुपम लावण्याने आमंत्रित करत होते.......

अंदमान–निकोबार येथील निसर्ग माणसाला फार ढवळा ढवळ करू देत नाही इतका तो स्वयंपूर्ण व संपूर्ण आहे. तेथील हवापाणी यांचा वोचरा व वाधक उपद्रव व उद्रेक होत नसल्याने संचार निर्धोक व निरामय राहतो. उत्साहजनक व आनंददायक बनतो. अधिवास आणि अनुभव जीवनदायक होतो.

—अंदमान–निकोबार द्वीपसमुहातील विखुरलेल्या बेटांची शैली अशी कीं, विमानातून पाहिल्यावर पाण्यावर एक नेत्रदीपक भू–माला अलंकारली असे प्रत्ययास येते. येथे हे वाक्य लिहितानाहि स्वातंत्र्यवीरांच्या राष्ट्रीय दिव्य दृष्टीस जे अंदमानचे या संबंधातले पहिले दृश्य दिसले ते सतत नजरेसमोर येते. 'ज्या दिवशी आम्ही अंदमानात पाय टाकला त्या दिवसापासून आम्हास असे वाटत आहे कीं, हिंदुस्थानचा अंदमान हा एक जलदुर्ग आहे. आज नाही उद्या इथे वैमानिक आणि सामुद्रिक ठाणे स्थापन केले जाईल—आणि पूर्वेच्या राजकीय महत्त्वाकांक्षेचा अन्याय आक्रम जर कधी हिंदुस्थानावर झाला तर त्यांच्या सामुद्रिक रण-नौकास आणि विमानास पहिला शह अंदमानचा दुर्ग देईल.' प्रत्येक बेटाचे स्वतःचे असे आगळे अस्तित्व आणि अजिंक्यपण अजस्र प्रकृतीची ढाल दिमाखाने समोर धरून उभे असल्याचे जाणवते. आणि हिंडण्याचा, हुंदडण्याचा कंटाळा तर येत नाहीच, उलट तेथील अनुभवाचा गुणाकार करण्याचा मोह अविरत होत जातो. बंदिस्त अवस्थेत असलेल्या सावरकरानीहि बेटावर पाऊल ठेवताच उद्गार काढले कीं 'समुद्रात ते बेट असे शोभे कीं, जसा एखाद्या अप्सरेचा सरोवरात बांधलेला बंगला. खरोखरीच ते बेट बेटाचे मानाने इतके चिमकुले, आटोपशीर आणि शोभिवंत दिसे कीं, क्षणभर बेड्या पडलेल्या मनाचेहि मनोरंजन व्हावे' याच-करता भारताचे पहिले रँग्लर कै. र. पु. परांजपे सहर्ष म्हणाले, 'मी माझ्या उम्या आयुष्यात या बेटातल्या पेक्षा अधिक आल्हाद-दायक सुटी घालवली नाही'.

खुद्द माझ्या आयुष्यात मी अंदमान बेटात जेवढा हिंडलो, फिरलो आणि गुंगलो तेवढा कुठेच गमलो नाही याचे रहस्य झाले तरी हेच होय. मन लावून काम व संचार सुरू झाला. आणि स्थळांची सौंदर्ये आणि सौंदर्याच्या स्थळानी असा काही चटका लावला कीं विचारता सोय नाही.....आलो तेव्हा अंदमान-निकोबार काय होते आणि जाताना काय झाले होते? वास्तविक आलो तेव्हा कधी काळी अंदमानहून परतताना मी विमानाने परतेन असे अंदमानकराना स्वप्नातहि वाटले नसते. पण जेव्हा मी विमानाने परतावयास निघालो तेव्हाच्या अंदमानकरांच्या भावना पूर्वीच्या प्रकरणात वर्णिल्या आहेतच. पण त्यांच्या भावनेत ज्या भारताच्या वैकुंठी निघालो होतो त्याचा 'राम राम' कायमचा नव्हता. दोघांच्या नात्यात एक भावबंध निर्माण झाला होता. मला






स्वत:ला विमानातून जाताना अंदमानचे जे विहंगम दृश्य दिसत होते ते विहंगमावलोकनास चालना देणारे होते. परतताना प्रयाणाचा असा क्रम आहे कीं अंदमान बेटांचे जवळ जवळ दीड तास विहंगम दृश्य दिसते. रंगूनमार्गे हे प्रयाण असते. अंदमानचा किनारा सोडल्यावर या दीड तासात ज्या ठळक गोष्टी मनावर बिंबत होत्या त्यातील माझ्या आमदानीत सुरू होऊन पूर्ण झालेली सायवूडची फॅक्टरी, रंगतची नवी होत असलेली जेटी, रंगत, बेटापूरची दिगलीपूरची नवी वस्ती व रस्ते, मायाबंदरचे इस्पितळ इ. इ. जणु सांगत होत्या कीं, 'या नंदनवनात जर काही बिघडले. तर ते नीट व नीटस् होण्याची सर्व सिद्धता पूर्ण झाली आहे. किनारा सोडला, माणसे सोडली, हृदय हलले तरी ही 'तुटी' कायमची नव्हे. असं काही झालं आहे कीं, ते चंचल काळाच्या बदलत्या लाटाहि पुसू शकणार नाहीत......'



विना मच्छी नहीं अच्छी, विना सहकार नही उद्धार

● ● ●

# इंग्लंडचं ब्रह्मचर्य गेलं पण गाढव राहिलं!

—अरविंद ताटके

## सिरीजचा शिल्पकार सोबर्सच



**होणार** होणार म्हणून गाजत असलेल्या विंडीज-इंग्लंडच्या टेस्ट झुंजी होऊन गेल्या. सध्या तरी, वेस्ट इंडिज संघाचा कुणी पराभव करील अशी अटकळ कुणीही बांधली नसल्यानं त्या संघानं कसोटी मालिका जिंकली याबद्दल जाणत्याना फारसं आश्चर्य वाटलं नाही. १९६०–६१ साली वॉरेलच्या नेतृत्वाखालच्या संघानं ऑस्ट्रेलियन संघाविरुद्ध जी मर्दुमकी गाजविली तेव्हापासून विंडीजना जी अपार लोकप्रियता लाभली ती अजून अक्षय आहे, टिकून आहे. ६०–६१ साली विंडीजना पराजय पत्करावा लागला खरा पण तो विजयापेक्षा श्रेष्ठ ठरला. कुणी कुणी संभाजीच्या कृत्यांपेक्षा त्याचा मृत्यूच श्रेष्ठ ठरला असं मानतात. थोड्याबहुत फरकानं विंडीजच्या बाबतीत तसंच घडत गेलं. पराभवातहि त्यानी जे चुरशीचं बीज पेरलं, त्यानं सारं क्रिकेट ब्रह्मांड उजळून निघालं. नंतर विंडीज संघ १९६२, १९६३ व १९६५ या साली भारत, इंग्लंड अन् ऑस्ट्रेलिया या देशांविरुद्ध खेळून अजिंक्य राहिला. अन् याहि झुंजीत त्यानं विजयाची परंपरा कायम ठेवली. युद्धोत्तर काळात विंडीजनं १९४६–४७ साली वेस्ट इंडिजमध्ये इंग्लंडचा अन् नंतर १९५० मध्ये पुन्हा इंग्लंडमध्ये इंग्लंडचा जो दणदणीत पराभव केला तेव्हापासून काही यशापयशाचे चढउतार जमेस धरूनहि वेस्ट इंडिज संघानं आपल्या बलाढ्यपणाचा लौकिक कायम ठेवला. काही वेळा तो टेस्ट सामने हरलाहि. पण त्या संघाबद्दल प्रतिपक्षाला वाटत असलेल्या दहशतीत अणुमात्रहि फरक पडला नाही.

तेव्हा विंडीजच्या या मागच्या इतिहासामुळं अलीकडच्या इंग्लंडविरुद्ध टेस्ट मालिकेत त्यानं घसघशीत विजय मिळविला तेव्हा मला तरी त्याबद्दल फारसं आश्चर्य वाटलं नाही. ही गोष्ट सृष्टिक्रमाला धरूनच झाली. त्यात हुरळून जाण्यासारखं काय आहे? कारण १९२८ सालापासून ते आजतागायत उभय देशाच्या ज्या टेस्ट झुंजी झाल्या त्यात विंडीज संघ इंग्लंडशी चांगलाच तुल्यबळ ठरला आहे. १९२८ पासून आतापर्यंत उभय संघात १२ मालिका खेळल्या गेल्या त्यात दोन्ही संघानी प्रत्येकी पाच मालिका जिंकल्या असून दोन मालिका अनिर्णित राहिल्या आहेत. उभय संघात आतापर्यंत ५० टेस्ट सामने खेळले गेले असून त्यापैकी इंग्लंडने

१७ व विंडीजने १६ जिंकले अन् १७ अनिर्णित राहिले. यावरून एक गोष्ट स्पष्ट होते कीं १९२८ साली विंडीजने टेस्ट आखाड्यात पाऊल टाकले तरी या घडीला तो संघ जगात अग्रगण्य ठरला आहे.

यावेळी विंडीजचा संघ प्रथमपासून तयारीत होता. सोबर्स-सारखा अष्टपैलु क्रिकेटपटु आज जगात दुसरा नाही. या मालिकेला सुरुवात होण्यापूर्वी त्यानं टेस्ट सामन्यात चार हजाराहून जास्त धांवा व ११० विकेटस् घेतलेल्या होत्या. १४ शतकं त्याच्या नावावर होती. शिवाय नेतृत्वातहि १९६५ मध्ये त्यानं ऑस्ट्रेलियाविरुद्ध लौकिक मिळविला होता. त्याच्या मदतीला कन्हाय, हंट, बुचर, नर्स हे फलंदाज अन् हॉल, गिब्ज नि ग्रिफिथ हे गोलंदाज असल्यानं अन् शिवाय तो स्वतःहि गोलंदाजीत प्रवीण असल्यानं सांघिक दृष्टचा हा संघ श्रेष्ठ वाटत होता. पिटर मे गेल्यापासनं काही काळ टेड डेक्स्टरनं इंग्लंडचा पडता डोलारा सावरला असला तरी त्या संघाची शान पार विसकटली होती. बॅरींग्टनचा बहर ओसरत चाललाच होता तर काऊड्रीच्या फलंदाजीतलं सातत्य पार संपुष्टात आलं होतं. तीनशें विकेटस् टेस्ट सामन्यात घेणारा ट्रुमन टेस्ट आखाड्यातून बाहेर फेकला जाण्याच्याच मार्गावर होता. एकंदरीत काय तर काप गेले अन् भोकं राहिली अशी होती इंग्लंडची स्थिती. काऊड्री कसलेला फलंदाज खरा. पण त्याच्यात नेतृत्वाचे गुण अजिबात नाहीत. इंग्लंडच्या निवडसमितीच्या ध्यानात ही गोष्ट लौकर कां आली नाही हे एक न उलगडणारे कोडे आहे.

होता होता मँचेस्टर येथे ओल्ड ट्राफोर्ड मैदानावर २ जून रोजी उभय संघांच्या चकमकीस सुरुवात झाली. नाण्यानं कौल सोबर्सच्या बाजूनं दिला. अन् फलंदाजीस सुरुवात झाल्यावर पहिल्याच दिवशी विन्डिजनं चांगल्या ३४३ धावा केल्या. हंटने तडफदार शतक केलं (१३५). कन्हाय आला अन् गेला. बुचर—नर्सची साथ चांगली झाली. अन् मग सोबर्सनं दुसऱ्या दिवशी १६१ धावा काढून टस्टमधलं आपलं पंधरावं शतक फटकविलं. विंडीज संघानं ४८४ धांवा केल्या. इंग्लंड अवघं १६७ धावातच बारगळलं. त्यांचा संघ गुंडाळला गिब्जनं. त्यानं २८ पट्कात ५ विकेटस् घेतल्या. दुसऱ्या डावात इंग्लंडचा आघाडीचा फलंदाज मिलबर्न यानं ९४ धावा केल्यावर तो बिचारा धावबाद झाला. काऊड्रीनंहि ६९ धावा केल्या. पण इंग्लंडची मदार काही २७७ धावापुढं न गेल्यानं त्याला एक डावाचा मार खावा लागला. दुसऱ्या डावातहि गिब्जचं सुदर्शन चक्र प्रभावी ठरलं. सोबर्सनंहि ३ विकेटस् घेतल्या. विंडीजच्या या विजयाचे शिल्पकार हंट, सोबर्स अन् गिब्ज हे होत. पांच दिवसाचा हा कसोटी सामना अवघ्या तीन दिवसात संपला. अशा रितीनं विजयाची पहिली फेरी विंडीजने जिंकली. शेवटच्या दिवशी सामना पहाण्यास १९००० प्रेक्षक उपस्थित होते. जगातला पहिल्या प्रतीचा अष्टपैलु खेळाडू म्हणून सोबर्स पुन्हा चमकला. त्यानं शतक काढलं, दुसऱ्या डावात इंग्लंडचे ३ बळी घेतले व या सामन्यात दोन्ही डावात मिळून त्यानं ५ झेल घेतले. गिब्जच्या ऑफ स्पिनपुढं इंग्लंडचे फलंदाज पत्त्याच्या बंगल्यासारखे धडाधड कोसळले. इंग्लंडचा कर्णधार माईक स्मिथ तर दोन्ही डावात साफ कोसळला. गिब्जच्या गोलंदाजीपुढं इंग्लिश खेळाडूंची एकच गाळण उडाल्यानं विंडीजनं सामना अलगदपणं खिशात टाकला.

लॉर्डस म्हणजे क्रिकेटची काशी जणु. चांगले खेळाडू इथं टेस्टमध्ये खेळण्याचं स्वप्नं नेहमीच उराशी बाळगतात. वेस्ट इंडिजची दुसरी टेस्ट इथं झाली. स्मिथच्या ऐवजी काऊड्री इंग्लंडचा संघनायक होता तर फलंदाजी मजबूत व्हावी म्हणून जुना शैलीदार अन् तडाखेबाज फलंदाज टॉम ग्रॅव्हनी याचा समावेशहि इंग्लंडच्या संघात करण्यात आला होता. इंग्लंडची ही परंपरा जुनीच आहे म्हणा. मागं एकदां कॉम्पटन अन् वॉशब्रुक या जुन्या खोडाना प्रवेश देऊन इंग्लंडनं टीकेचं मोहोळ ओढवून घेतलं होतं. पण यावेळी ग्रॅव्हनीचा लाभ इंग्लंडला शकुनवत ठरला अन् ज्याची फटकेबाजीत व व्यक्तिमत्वात वली हॅमंडशी तुलना केली जाते त्या ग्रॅव्हनीनेहि आपली निवडीची यथार्थता उत्कृष्टपणं पटवून दिली.

पहिल्या दिवशी पावसानं कहर केल्यानं जवळ जवळ सवातीन तास फुकटच गेले. अर्थातच पहिल्या दिवशी विंडीजच्या फक्त १५५ धावाच त्या दिवशी झळकल्या. दुसऱ्या दिवशी २६९ धावात विंडीज संघ गुंडाळला गेला. बुचर ४९, सोबर्स ४६ अन् नर्स ६४ एवढे तीनच शिलेदार चमकले. इंग्लंडच्या हिग्जची करामत यशस्वी ठरली. त्यानं तेहेत्तीस षट्कात सहा बळी घेतले. इंग्लंडनं १४५ धावा काढून दोन बळी दिले होते. तिसऱ्या दिवशी बिचाऱ्या ग्रॅव्हनीचं शतक अवघ्या ४ धावानी चुकलं. टेस्टमध्ये एवढचा थोडचा धावानी शतक चुकण्याचे प्रसंग अनेकदा घडतात. त्यावेळी खेळाडूला किती वाईट वाटतं त्याचे किस्से टेस्ट खेळाडूंकडून ऐकण्यातच मौज आहे. पार्क्सचं शतकहि ९ धावानी हुकलं तरी इंग्लंडनं ३५५ धावाची मजल मारून विंडीजच्या पहिल्या डावावर मात केली. चौथ्या दिवशी सोबर्सनं पुन्हा शतक झळकविलं. कसोटी सामन्यातलं हे त्याचं सोळावं शतक. ५४ टेस्ट सामने खेळून त्यानं एवढी शतकं काढली. त्यातल्या ५३ टेस्ट तर तो लागोपाठ खेळला. विंडीजच्या या दिवशी २८८ धावा झाल्या अन् त्यांचे पाच गडी शिल्लक होते. सोबर्स तर नाबादच होता. त्या दिवशी त्याचं शतक लागल्यावर एका वेस्ट इंडियन प्रेक्षकाला आनंदाचे एवढं भरतं आलं कीं तो तुरतुरत धावत पिचवर गेला अन् त्यानं सोबर्सला कडकडून मिठी मारली. इंग्लंडमध्ये असे प्रकार क्वचितच होतात. आपल्याकडं या घटना नेहमीच्याच. मागं तर मुंबईला झालेल्या एका टेस्ट सामन्यात आमच्या अब्बास अल्ली बेगचं एका मुलीनं पिचवर जाऊन चुंबन घेतल्याचा प्रसंग रसिकांच्या स्मरणात असेलच. असो. अशा प्रसंगामुळं क्रिकेटला एक आगळी शोभा अनेकदा लाभते. मागं आमचा पुण्याचा बाबु






टांगेवाला कित्येक खेळाडूना क्रीडांगणावर जाऊन हार घालायचा, त्यावेळी ते दृष्य मोठं विलोभनीय असायचं. अखेरच्या दिवशी ३६९ धावा झाल्यावर विंडीजनं इंग्लंडला खेळण्यास दिलं. विंडीजचे पाच खेळाडू बाद झाले. सोवर्स १६३ धावा काढून नाबाद राहिला. इंग्लंडचे चार गडी फक्त ६७ धावात बाद झाले. खेळ संपायला दोन तासाचा अवधि होता. पण ग्रॅव्हनी अन् मिलबर्ननं हा सामना अनिर्णित ठेवण्याचा पराक्रम केला. उभयतानी १३० धावांची भागिदारी केली अन् सामना अनिर्णित ठेवला. मिलबर्ननं शतकहि काढलं तर ग्रॅव्हनीनं ३० धावा केल्या.

तिसरा कसोटी सामना झाला नॉटिंगहॅमला. पहिल्या दिवशी विंडीज संघ अवघ्या २३५ धावातच बारगळला. नर्सच्या ९३ धावा हे या दिवसाचं वैशिष्टय. स्नो–हिग्ज या जोडगोळीनं विंडीजची मोहरी टिपली. इंग्लंडचे पहिले तीन गडी अवघ्या १३ धावातच तंबूत परतले. काऊड्री अन् ग्रॅव्हनी टिकून राहिले. दुसरा दिवस या उभयतानी गाजविला. ग्रॅव्हनीनं शतक काढलं तर काऊड्री ९४ धावा काढून बाद झाला. दोघानी १६९ धावांची भागिदारी चौथ्या विकेटसाठी केली. वाईट सुरुवातीनंतर इंग्लंडनं २५४ धावांची मजल मारली अन् त्यांचे तीन गडी अजून शिल्लक होते. तिसऱ्या दिवशी इंग्लंडनं ३२५ धावा उभारल्यावर विंडीज पुन्हा खेळण्यास आले. दोन गडी बाद १३८ असा त्यांचा धावफलक होता अन् कन्हाय अन् बुचर अनुक्रमे ५० व ४७ धावा काढून नाबाद होते. चौथा दिवस बुचर, सोबर्स अन् नर्सनी गाजविला. बुचरनं काढलं द्विशतक (२०९) तर सोबर्सचं शतक अवघ्या सहा धावानी हुकलं. धावांची अन् शतकांची हाव असलेला तो तेव्हा किती हळहळला असेल त्याची कल्पना वाचकानी करावी. नर्सनेहि ५३ धावा काढल्या. विंडीजनं ४८२ धावांचा कोट रचून या टेस्टमधला आपला विजय पक्का केला. पाच गडी उरले असतानाहि सोबर्सनं डाव पुरा झाल्याचं घोषीत करून इंग्लंडला खेळण्यास दिलं. एकहि विकेट जाऊ न देता इंग्लंडनं ३० धावा केल्या.

शेवटच्या दिवशी सामना जिकण्यास इंग्लंडला ३६२ धावांची गरज होती. पण इंग्लंडला सामना सावरता आला नाही. २५३ धावात त्याला विंडीजनी चीत केलं. सोवर्स, हॉल, ग्रिफीथ अन् गिब्ज या चौकडीनं इंग्लंडचे गडी पटापट बाद करून १३९ धावानी सामना जिंकण्याचं यश पदरात पाडलं. आतापर्यंत दोन टेस्ट सामने विंडीजनं जिंकले असल्यामुळं मालिका त्यानी खिशात टाकल्यासारखंच होतं.

लीड्स येथे चौथा टेस्ट सामना झाला. इथंच १९४८ साली ब्रॅडमनमॉरीसनं एका दिवसात ४०४ धावा करून सामना जिंकला होता. इथंच ब्रॅडमननी १९३० अन् १९३४ साली टेस्टमध्ये त्रिशतके काढली होती. इथंच १९३० साली त्यानी एका दिवसात टेस्टमध्ये स्वतःच्या ३०९ धावांचा फड मारण्याचा भीमपराक्रम केला होता. अशा या गाजलेल्या लीड्स क्रीडांगणावर विंडीज-इंग्लंड संघ आले तेव्हा अनेक स्मृती रसिकांच्या मनात रेंगाळत असल्या तर नवल नव्हे.

पावसानं व्यत्यय आणल्यानं पहिल्या दिवशी विंडीजच्या १३७ धावा झाल्या. बुचर–नर्स टिकून होते. दुसऱ्या दिवशी विंडीजनं आपली धावसंख्या ५०० वर नेऊन सामना अन् मालिका जिंकण्याची मुहूर्तमेढ रोवली. नर्सनं शतक काढलं. सोबर्सनं या मालिकेतलं तिसरं शतक (१७४) अन् टेस्ट सामन्यातलं सतरावं शतक काढलं. नर्स–सोबर्सनं पाचव्या विकेटसाठी २६५ धावांची भागिदारीहि केली. सोबर्सचा हा डाव अगदी रंगतदार झाला. केवळ एकटयाच्या बाहुबळावर त्यानं विंडीजच्या यशाचा गोवर्धन उचलला. या सामन्यात त्याच्या ८३ धावा झाल्या तेव्हा टेस्ट कारकीर्दीतल्या त्याच्या ५००० धावा पुऱ्या झाल्या. टेस्टमध्ये एवढ्या विपुल धावा करणारे फक्त आठ जण आहेत. नववा मान सोबर्सनं मिळविला. यावेळी त्यानं २४३ मिनिटात १७४ धावा केल्या. या सुमारास चार टेस्ट मिळून त्याच्या ६४१ धावा झाल्या होत्या. दिवस संपताना इंग्लंडनं एकहि गडी बाद न होऊ देता ४ धावा केल्या होत्या.

'अंगं पलितं मुंडं जात्म' अशी इंग्लंडची अवस्था झाली अन् पहिल्या डावात अवघ्या २४० धावात तो संघ कोसळला. यावेळी एकोणीस षट्कात ४१ धावा देऊन सोबर्सनं ५ बळी घेतले. हॉल व ग्रिफीथ्ची त्याला जोड मिळाली. इंग्लंडला फॉलोऑन मिळाला. वास्तविक इंग्लंडचा संघ २०० च्या आतच गडगडायचा. पण त्यांच्या दिग्ज या गोलंदाजानं ४९ धावा ठोकल्यानं इंग्लंडची अब्रु थोडी सावरली. त्यानं दोन षट्कार अन् पाच चौकार त्यावेळी मारले. त्याचं अर्धशतक लागेल म्हणून २५००० प्रेक्षकांचा समुदाय मोठ्या उत्सुकतेनं त्याच्या टोलेबाजीकडं पहात होता. पण प्रेक्षकांची इच्छा सोबर्सनं पुरी करून दिली नाही. त्याच्या गोलंदाजी-

### स्त्रिया व क्रिकेट

युद्धोत्तर काळातील इंग्लंडचा सर्वश्रेष्ठ फलंदाज वॉल्टर हॅमंड ह्याची शोकांतिका बायकोनेच घडवली. दुसऱ्या महायुद्धानंतर हॅमंड ऑस्ट्रेलियास गेला होता. हॅमंडने शतक, द्विशतक (छत्तीसावे) अशी दणकेबाज सुरवात केली. आणि हे त्याच्या बादशाही पद्धतीने सुकीर्तीत शोभेल असे. ह्याच वेळेस त्याच्या पत्नीने त्याला घटस्फोट दिला. परदेशात झालेल्या ह्या मानहानीने व मानसिक त्रासामुळे पुढे त्याच्या खेळावर लक्ष हवे तितके राहीना. तो अपयशी ठरला. ह्या त्याच्या शेवटच्या दौऱ्यात तो यशस्वी ठरला तर राष्ट्रीय वीर ठरून 'सर' की मिळाली असती. परंतु त्याला शेवटी इंग्लंडहि सोडावे लागले व द. आफ्रिकेत उरलेले दिवस घालवावे लागले! ह्या सर्वास कारण स्त्री! . . . .



अनुक्रमणिका

वर नर्सला झेल देऊन हिग्ज बाद झाला. चौथ्या दिवशी सोबर्स–अन् गिब्जची गोलंदाजी धारदार बनली अन् मग २०५ धावात इंग्लंडचा खुर्दा झाला अन् विंडीजनं मालिका खिशात टाकली. विकेट उत्तम असूनहि सोबर्स–गिब्जच्या माऱ्यापुढं इंग्लंडचा टिकाव लागला नाही. या सिरीजचा कर्तुम अकर्तुम अन् विंडीजना यशश्री मिळवून देण्यात सिंहाचा वाटा सोबर्सचा. बॅटींग, बोलींग, झेल टिपणं अन् नेतृत्व या चारहि शाखात त्याची कामगिरी प्रभावी झाली. नेतृत्वाच्या जबाबदारीनं त्याच्या बॅटींग–बोलींगमधल्या कौशल्याला अजीबात तडा गेला नाही. गॅरी सोबर्स खरोखरीच 'ग्रेट' आहे यात शंका नाही.

अखेरचा ओव्हलवरील सामना म्हणजे नुसता उपचार होता. 'विक्रिते करिणी सती अंकूशे किं विवादः' या सुभाषिताप्रमाणं नुसता अंकुशाचा वाद एवढा तेवढा शिल्लक होता. विजयाचा ऐरावत विंडीजनं जिंकला होता. पण काय गंमत पहा. हा शेवटचा सामना विंडीजनं गमावला. काऊड्रींचा फजितवाडा पाहून इंग्लंडच्या निवड समितीनं त्याला अर्धचंद्र देऊन त्याच्या जागी कर्णधार म्हणून क्लोजची निवड केली. काऊड्री नामांकीत फलंदाज. पण नेतृत्वात तो अगदीच ढिला. आपल्या सहकार्यात तो ईर्षा उत्पन्न करू शकला नाही. 'करा वा मरा' हा मंत्र त्याला आपल्या सहकाऱ्याना देता आला नाही. ते काम क्लोजनं चोखपणं पार पाडलं.

अखेरच्या या सामन्यात विंडीजच्या कन्हायनं शतक काढलं. टेस्ट कारकीर्दीतलं हे त्याचं दहावं शतक. सोबर्स ८१ धावा काढून बाद झाला. विंडीज संघ २६८ धावात गुंडाळला गेला. इंग्लंडनं पहिल्या डावात ५२७ धावांचा कोट रचला. ग्रॅव्हनीनं १६५ धावा काढल्या. मुरेनंहि शतक काढलं. वास्तविक इंग्लंडची सुरुवात काही फारशी चांगली झाली नाही. एक वेळ त्यांचा धावफलक ७ बाद १६६ असा होता. पण ग्रॅव्हनी–मुरेनं डाव सावरला. उभयतानी आठव्या बळीसाठी २१७ धावांची भागिदारी करून ही शेवटची मॅच जिंकण्याची नांदी केली. शेवटच्या हिग्ज–स्नो या दोघानी दहाव्या विकेटसाठी १२८ धावांची भागिदारी करून विजयाची भैरवीच म्हटली जणु. आणखी २ धावा या जोडीनं केल्या असत्या तर दहाव्या विकेटची विक्रमी भागिदारी करण्याचा बहुमान त्याना मिळाला असता. यावेळीहि हिग्जने एक गगनचुंबी षट्कार मारलाच. इंग्लंडच्या शेवटच्या तीन गड्यानी ३६१ धावा केल्याचा पराक्रम हा कसोटी सामन्यांच्या इतिहासात अपूर्वच मानला पाहिजे. ट्राफलगारच्या लढाईत इंग्लिश सैनिक ज्या शर्थीने लढले त्याच जोषात इंग्लंडचे खेळाडू खेळले अन् त्यामुळे या सामन्याच्या विजयाचं शिक्कामोर्तब त्यानी पक्कं केलं. तिसऱ्या दिवशी ४ बाद १३५ असा विंडीजचा धावफलक होता. कन्हाय बाद झाला होता. नर्स टिकून होता अन् सोबर्स खेळायचा होता म्हणून चौथ्या दिवशी काही अघटित घडून या सामन्याला वेगळीच कलाटणी मिळेल अशी आशा काही वेड्याना वाटत होती. इंग्लंड हरत नाही हे निश्चितच होतं. अन् विंडीज जिंकत नाही हेहि निश्चित होतं. चौथ्या दिवशी सोबर्सचा झेल क्लोजनं टिपला अन् तिथंच सामना संपला. गॅरी सोबर्स शून्यात बाद झाला अन् तिथंच विंडीजचा पराभव अटळ ठरला. २२५ धावात विंडीज संघ कोसळला अन् मग क्लोजनं सोबर्सबरोबर विजयाप्रित्यर्थाची शँपेन मोठ्या झोकात घेतली. सोबर्स परतत होता तेव्हा पराभव अटळ आहे याची जाण त्याला आली होती. अखेरीस एक दिवस आधी या मालिकेतला हा एकुलता एक सामना जिंकून क्लोजनं इंग्लंडची पत बरीचशी सावरली यात शंका नाही. क्लोज जर प्रथमपासून संघनायक निवडला गेला असता तर या मालिका जास्त चुरशीनं लढल्या गेल्या असत्या हे सत्य नाकारता येत नाही.

वेस्ट इंडिजनं विस्डेन करंडक तर जिंकलाच, मालिकाहि जिंकली अन् क्रिकेट क्षेत्रातलं अजिंक्यपदहि जिंकलं. त्याचं सारं श्रेय त्यांचा संघनायक सोबर्स यालाच दिलं पाहिजे. क्रिकेटमधली प्रत्येक शाखा त्यानं कौशल्यानं अन् पराक्रमानं हाताळली. मालिकेत त्यानं तीन शतकं काढली अन् ७२२ धावा काढल्या. त्याची बॅटींगमधील सरासरी भरली १०३.१४. जोडीला त्यानं २० विकेट्सहि घेतल्या. आतापर्यंत टेस्ट कारकीर्दीत त्यानं ५१७२ धावा केल्या असून १७ शतके काढली आहेत. जोडीला १३० विकेट्सहि त्यानं घेतल्या आहेत. असा अष्टपैलु विक्रम करणारा दुसरा क्रिकेट्पटु दुसरा नाही. ही करामत त्याने ५७ टेस्ट सामन्यात केली. त्याच्या गोलंदाजीचा बहर असाच राहिला तर २००

विकेटस् घेण्याचा विक्रम तो सहज करू शकेल. आपल्यासंघाचं सामर्थ्य एकजिनसी ठेवण्यात त्यानं अपूर्व यश मिळविलं. विंडीज संघाचं टीमवर्क अपूर्व दिसलं. पण एक गोष्ट मात्र स्पष्ट सांगितली पाहिजे कीं सोवर्सच्या सामर्थ्यावरच हा विंडीज संघ या खेपेस एवढं यश मिळवून गेला. तो जर निष्प्रभ पडता तर या मालिकेचा इतिहास वेगळा झाला असता. युद्धोत्तर काळात इंग्लंडमध्ये टेस्ट मालिकेत ७२२ धावा करणारा सोवर्स हा एकच फलंदाज आहे.

इंग्लंडकडं जमेची बाजू फार थोडी आहे. ग्रॅव्हनीनं आपली निवड पटवून दिली. काऊड्रे आता संपत चालल्याची खूण स्पष्ट झाली. बॅरींग्टनहि तेजीत नाही. मावळता सूर्य म्हणूनच त्याच्याकडं पहायचं. सध्या तर इंग्लिश संघ मामुली दिसतो. क्लोज जर दोन चार वर्ष त्या संघाचा नेता राहिला व अनेक नवे फलंदाज-गोलंदाज इंग्लंडकडं उदयास आले तरच आंतरराष्ट्रीय क्रिकेटमध्ये त्याची शान शाबूत राहील. त्यांच्या हिग्जनं वोलींगमध्ये चांगलं प्राविण्य दाखविलं व आणीबाणीच्या प्रसंगी धावाहि काढून दाखविल्या. ग्रॅव्हनी चांगलाच चमकला. तरुण फलंदाजात मिलबर्न व डी ऑलव्हीरा यानी आशा निर्माण केली आहे.

युद्धाच्या आधीच्या काळात वेस्ट इंडिजमध्ये हेडले–कॉन्स्टंटाईनसारखे फलंदाज उदयास आले तर युद्धोत्तर काळात, वीक्स, वॉरेल, वॉलकॉट, रामाधीन, व्हॅलेंटाईन, कन्हाय, सोवर्स, हॉल यांच्यासारखे अथियहारथि निर्माण झाले. अवघ्या तीस वर्षांत विंडीजनी प्रगतीची जी घोडदौड मारली त्यावरून आपल्याला बरेच शिकण्यासारखे आहे. युद्धोत्तर काळात हटन, कॉम्पटन, मे, वेडसर, ट्रुमन, स्टेथॅम, इव्हान्स, लेकर या क्रिकेटपटूनी इंग्लंड गाजविले. तो जोष, तसे सामर्थ्य आताच्या इंग्लिश संघात नाही. या मालिकेपुरतं बोलायचं तर गाढवहि गेलं अन् ब्रह्मचर्यहि गेलं असा प्रकार न होता शेवटचा सामना इंग्लंडनं जिकल्यानं ब्रह्मचर्य गेलं तरी एक सामना जिंकून गाढव राखण्याची बहादुरी इंग्लंडनं राखली हेहि नसे थोडके. सगळी मालिका संपली तेव्हा आठवण राहिली फक्त गॅरी सोवर्सची. तोच या सिरीजचा खराखुरा शिल्पकार. इंग्लंडचं गाढवं तरी राहिलं. आमचं, येत्या हिवाळ्यात होणाऱ्या टेस्ट झुंजीत काय राहतं ते सोवर्स आणि कंपनी इकडं खेळेल तेव्हाच दिसेल....!!

●●●



# क्रिकेट म्हणजे एक गंमत आहे झालं !

क्रिकेटचा खेळ म्हणजे एक गंमत आहे झालं ! कधी खेळ प्रत्यक्ष बघायला मजा वाटते, कधी त्यासंबंधी नुसते वाचायलाही खूप करमणुकीचे वाटते. धावांचा जसा डोंगर होऊ शकतो तसा क्रिकेट–विषयक गंमतीदार माहितीचाही डोंगर होऊ शकतो. विशेषत: ह्या खेळात जे चित्र–विचित्र उच्चांक गाठले गेले त्याची नवलाई केवळ न्यारीच आहे.

आता हेच पहा ना! कोणी म्हणे एक लॅंकेस्ट्रीयन नावाचा डावखुरा फलंदाज होता. तो म्हणे मे महिन्यातील मंगळवारी (फक्त) जास्तीत जास्त नाबाद डाव खेळला आहे. तसेच गोलंदाजाने चेंडूने 'बेल' उडविली ती जास्तीत जास्त लांब किती जावी?– चांगली ८३ यार्डस् १ फूट ९ इंचांवर जाऊन पडली!!

☆ ☆ ☆

एके वर्षीच्या 'विस्डेन'ने मजेशीर घटना नोंद करून ठेवली आहे. "देरा–इस्माईल खान" ह्या संघाविरुद्ध खेळताना पाकिस्तानी रेल्वे संघाने ६ बाद ९१० धावसंख्या काढून आपला डाव जाहीर केला व "देरा–इस्माईल खान" संघाला पहिल्या डावात ३२ व दुसऱ्या डावात २७ धावात बाद केले. १९२० साली व्हिक्टोरीया संघाने न्यू साऊथ वेल्स् संघाविरुद्ध खेळताना ११०७ धावा केल्या होत्या. न्यू साऊथ वेल्स्च्या आर्थर मेलीने एकही निर्धाव षट्क न टाकता ६४ षट्कात ३६२ धावा दिल्या व फक्त ४ गडी बाद केले. गोलंदाजाला इतकं 'झोडपून' काढल्याचा हा दाखला एकमेव. तसे इतर अनेक दाखले आहेत. फ्लेटवुडस्मिथ ह्या गोलंदाजाने १९३८ साली ओव्हल येथे कसोटी सामना खेळताना २९८ धावा देऊन फक्त १ गडी बाद केला होता. ह्याच सामन्यात हटनने ३६४ धावाचा उच्चांक केला होता; तर ज्या सामन्यात सोबर्सने हटनचा हा उच्चांक मोडला त्या सामन्यात खान–महमद ह्या गोलंदाजाने २५९ धावा देऊन एकही बळी घेतला नाही. हनीफ महमदचा उच्चांक मजेशीर आहे. अव्वल दर्जाच्या सामन्यात दीर्घकाळ (९९९ मिनिटे) डाव तोच खेळला आहे तर दुसऱ्या एका अव्वल दर्जाच्या सामन्यात नाबाद ४९९ धावा काढून, आतापर्यंत जास्तीत जास्त धावा काढणारा फलंदाज म्हणूनही लौकिक मिळविला आहे.

☆ ☆ ☆

कमीत कमी धावा काढण्याचा विक्रम सॉमरसेटच्या क्लार्क ह्या फलंदाजाने १९३० साली केला आहे. त्यासाली क्लार्क एकूण ९ डाव खेळला पण पठ्ठयाने एकाही डावात भोपळा फोडला नाही ! तर जी. डेव्ही ह्या यॉर्कशायरच्या फलंदाजाने १९०७ साली १४ डावांत फलंदाजी करून फक्त तीन धावा केल्या. वॉर्सेस्टरशायरच्या गिबन्स् ह्या फलंदाजाने १९३९ साली एकाच सामन्यात दोन्ही डावात प्रत्येक वेळी २०० धावा काढल्या तर पुढील सामन्यात दोन्ही डावात प्रत्येक वेळी शून्य धावा काढण्याची करामत केली.

–गंमत्या

# भारत-वेस्ट इंडिज ●●●●

## कसोटी सामन्यांचा चित्तथरारक इतिहास

प्रा. सुरेश गजेंद्रगडकर

ह्या लेख वाचकांच्या हाती पडेल त्या-वेळी जगातील सर्वात बलिष्ठ ठरलेला वेस्ट इंडीजचा संघ भारतात आला असेल. त्या संघात अनेक वीरशिरोमणी आहेत. वेस्ट इंडीजच्या संघाशी होत असलेली भारताची ही पाचवी भेट आहे. पहिल्या चारीहि भेटींचा इतिहास आपण थोडक्यात पाहिले तर आपल्याला भविष्यात काय वाढून ठेवले आहे याची जाणीव प्रखर-तेने होईल. भारताची पहिली भेट १९४८-४९ साली वेस्ट इंडीज संघाशी पडली. सुदैवाने तो संघ भारताच्या दौऱ्यावर आला असताना म्हणजे 'आपल्याच घरात' हे सामने झाले. भारतीय संघ नुकताच ऑस्ट्रेलियाला जाऊन आला होता. जरी कसोटी सामन्यांची मालिका ब्रॅडमनच्या संघाविरुद्ध हरला होता, तरी आपल्या खेळाडूंपैकी हजारे, अमरनाथ, मंकड व फडकर ह्यांच्या चौफेर खेळामुळे व वैयक्तिक पराक्रमांमुळे भारतीय संघाचे सामर्थ्य इतराना पटले होते. अशा पूर्वेतिहासात सुरू झालेल्या मालिकेत वेस्ट इंडीजशी खेळताना भारत संघ विलक्षण आत्मविश्वासाने खेळत होता. वेस्ट इंडीज संघात जॉर्ज हेडली—काळा ब्रॅडमन—होता. परंतु पहिल्या सामन्यात त्याचा प्रभाव न पडल्याने पुढे त्याला वगळले. पुढे प्रसिद्धीस पावलेले तीन 'व' कार (वॉरेल—वीक्स व वॉलकॉट) गोडार्ड, गोमेझ इत्यादि अतिरथी महारथी ह्या संघात होते. असे असताना पहिले तीन कसोटी सामने अनिर्णीत राहिले व चौथा सामना (मद्रास येथील) वेस्ट इंडीजने १ डाव व १९३ धावानी जिकला. ह्याच डावांमध्ये रे व स्टॉलमेयर ह्या सुरवातीच्या जोडीने २३९ धावांची विक्रमी भागीदारी केली.

पांचवा कसोटी सामना अत्यंत संस्मरणीय ठरला कारण भारताला विजय मिळण्याची संधि असताना वेस्ट इंडीजच्या खेळाडूंनी वेळकाढूपणाचे अ—खिलाडू तंत्र वापरून सामना अनिर्णीत ठेवला. सीमापार गेलेला चेंडू आणण्यासाठी यष्टिरक्षक वॉलकॉटने चालत जाणे, गोमेझने षट्कातील निम्म्याहून अधिक चेंडू लेग स्टम्प्च्याहि बाहेर टाकणे, खेळ संपण्याच्या आधी वीस मिनिटे पेये मागवून वेळ घालवणे! हे क्रिकेट नव्हे! आणि नशीबाने देखील कौल भारताच्या विरुद्ध द्यावा, व पंचानी षट्कात एक चेंडू कमी देऊन एक मिनीट ठरलेल्या वेळेच्या अगोदर खेळ संपवावा ह्या परते दुर्दैव ते काय ? 'मात्र भारताने पहिल्या डावात कमी धावा केल्या तरी दुसऱ्या डावात चांगले खेळण्याचा नवीन पायंडा ह्याच मालिकेत पाडला. वीक्सने लागोपाठ पाच कसोटी—शतके ठोकून एक उच्चांक स्थापला तोहि याच मालिकेत ! (चार शतके ह्या मालिकेत व एक इंग्लंड-विरुद्ध शेवटच्या डावात)

ह्यानंतर १९५२—५३ मध्ये भारताने वेस्ट इंडीजचा दौरा केला त्या मालिकेतहि पाचापैकी चार अनिर्णीत व एक वेस्ट इंडिजने १४२ धावानी जिंकला. ह्या हरलेल्या सामन्यातील घसरगुंडी सोडल्यास भारतीय संघास खाली मान घालावयास लावणारे काहीही घडले नाही. ह्याच मालिकेतील सुभाष गुप्ते याचा पराक्रम त्याला जगातील उत्कृष्ट फिरक्या गोलंदाजांमध्ये नेऊन बसवणारा ठरला. (योगायोग असा की आता निवृत्त झाल्यावर गुप्ते वेस्ट इंडीज बेटातच स्थायिक झाला आहे.)



भारताचा कर्णधार पतौडी

ह्यानंतर सामन्यांचा आलेख भारताच्या दृष्टीने शरम वाटण्याजोगा आहे. अलेक्झांडरच्या नेतृत्वाखाली आलेला १९५८—५९ मधल्या संघाने ३—० असा भारताचा पराभव केला. हॉल, गिलख्रिस्ट ह्यांच्या माऱ्याला आमच्या खेळाडूना तोंड देता आले नाही. ह्या सामन्यांमधून



**चंदु बोर्डे**
**भारत संघाचे आशास्थान**

आमची जमेची बाजू म्हणजे चंदु बोर्डे ह्याने अखेरचा सामना अनिर्णीत ठेवण्यासाठी केलेली अविश्रांत धडपड, १०९ व ९६ अशा केलेल्या धावा! बाकी आमची ससेहोलपट!

ज्याप्रमाणे आम्हाला • वेगवान् गोलंदाजाना तोंड देता येत नाही हे एक कारण ह्या अपयशाचे देता येईल त्याप्रमाणेच ह्या मालिकेतील पांच कसोटी सामन्यांचे चार वेगळे कर्णधार, पहिला—उम्रीगर (गुलाम अहमद गैरहजर), दुसरा व तिसरा—गुलाम अहमद, चौथा—मंकड (सेनगुप्ता प्रकरणामुळे उम्रीगरचा राजीनामा) पांचवा—अधिकारी व त्यामागचे राजकारण हेहि कारणीभूत असू शकेल.

१९६१–६२ साली भारताने वेस्ट इंडीजचा दौरा केला. ह्यावेळी पांचही सामने भारत हरला. दोनदा पूर्ण डावानी व उरलेल्या तीन डावात काही धावानी भारताने मार खाल्ला. ह्या दौऱ्यातील अनेक संस्मरणीय घडामोडींपैकी कर्णधार नरी कॉन्ट्रॅक्टर ह्याला ग्रिफिथ् ह्या गोलंदाजाने जखमी करून क्रिकेटमधून कायमचे घालवले ही घटना भारतीयाना विशेष त्रासदायक वाटल्यास नवल नाही. (आणि ग्रिफिथ् चेंडू फेकतो हे सर्व फलंदाजांचे, त्यांच्या सर्वश्रेष्ठ कर्णधार व निवड समितीतील ज्येष्ठ अधिकारी वॉरेल् ह्याचेहि मत आहे हे लक्षात घेता आणि होणाऱ्या कसोटी सामन्यात पंचानी विशेष तेल घालून जपले पाहिजे! )

कॉन्ट्रॅक्टर जखमी झाल्यामुळे पतौडीकडे कर्णधारपद आले. त्याची आक्रमक वृत्ति, उम्रीगर व सलीम दुराणी ह्यांची शतके, कठीण प्रसंगी नाडकर्णीने काढलेल्या नाबाद ७८ धावा, हीच समाधानाची स्थाने. ह्या शेवटच्या दोन कसोटी मालिकेत सोबर्स, कन्हाय, स्मिथ, नर्स, सॉलोमन ह्यानी आपली केलेली लांडगेतोड व पन्नास धावात सहा बळी घेणारा हॉलन, (२४ बळी मालिकेत घेणारा) गिब्ज व अष्टपैलू सोबर्स ह्यांच्या गोलंदाजीने उडवलेली हवेलहंडी ह्यांचे स्मरणहि नकोसे वाटते.



**बापू नाडकर्णी**
**आंतरराष्ट्रीय किर्ती यावेळी दिसेल ?**



**जयसिंह**
**भारताची सिंहाची छाती**



**कुंदरन्**
**आघाडी लढवणार ?**

आणि भारतावरती असा निर्णायक विजयाचा फायदा मागे असलेला, नुकताच इंग्लंडसारख्या देशाच्या बलाढ्य संघावर सणसणीत विजय मिळवून आत्मविश्वासाच्या शिखरावर असलेला, हा संघ भारताशी सहावी मालिका खेळणार आहे.

भारताचा संघ जाहीर झाला असून संघातील पतौडी, बोर्डे, हनुमन्तसिंग, जयसिंह, इंजिनिअर, वाडेकर, सुरती, बेग, नाडकर्णी, सरदेसाई, व्यंकट राघवन्, चंद्रशेखर, दुराणी इत्यादिसह भारत संघ कागदावर तरी बलवान वाटतो. कसोटी मालिका वेस्ट इंडीज जिंकण्याची खात्री अधिक असली तरी भारत व्यवस्थित रीतीने तोंड देईल.

ज्या ससेक्सने ह्या वेस्ट इंडीजला ९ विकेटस्ने मार दिला त्याचा कप्तान हा आमचा पतौडीच होता हे आठवले की आमच्यावरचा आमचा विश्वास वाढेल आणि काही गौरवास्पद खेळ होईल अशी खात्री वाटते.

●●●

वेस्ट-इंडीजचा संघ भारताच्या दौऱ्यावर येत असताना

## सर फ्रँक वॉरेल

यानी व्यक्त केलेले हे मननीय विचार....

# 'क्रिकेट-वेडा' भारत

—दि. श्री. कराडकर



**भारतात** क्रिकेट खेळणं ही एक मजा आहे. जुन्या ओळखीना उजाळा मिळणार आहे व नव्या ओळखीना पालवी फुटणार आहे. कां कोण जाणे पण भारतात दौऱ्यावर जाण्यासाठी मी नेहमीच उत्सुक असतो. एक तऱ्हेची आपुलकी वाटते मला त्या देशात. राष्ट्रकुटुंब-संघाबरोबर मी आतापर्यंत तीनदा भारताचा दौरा केला आहे. आता क्रिकेटमधून निवृत्त झाल्यामुळे आपल्याला पुन्हा भारतात जाण्यासाठी संधी मिळणार नाही म्हणून मी मनातून खट्टू झालो होतो. परंतु आता कदाचित् पुन्हा भारतात येण्याची संधी मला मिळेल. कारण आमचा वेस्ट-इंडिज संघ भारताचा दौरा करणार आहे ना! ते जुने-हसरे चेहरे, तो उत्साही जनसंमर्द व प्रेक्षकानी फुलून गेलेली मैदाने, मला पुन्हा बघायला मिळतील.

क्रिकेटवर मनमुराद प्रेम करणारा देश म्हणून भारताचा लौकिक आहे, आणि इतका क्रिकेट-वेडा देश दुसरा नसेल असं मला वाटलं. मुंबईतील ते दृश्य मला अजून आठवतं. हजारो क्रिकेट शौकीन ब्रेबॉर्न-स्टेडियमवर कितीतरी अगोदर येऊन ठेपतात. केवळ चांगली जागा मिळावी व खेळ नीट पाहता यावा, ही अंतरीची आंस! इतर ठिकाणीसुद्धा हीच धडपड. आपल्या आवडत्या खेळाडूंचा खेळ पाहण्यासाठी हे शौकिन पाच पाच तास अवघडून बसतात—ऊन खात, घाम रिचवीत! निरनिराळे पेहराव करून आलेल्या ह्या शौकिनांची जत्रा चित्त प्रसन्न करणारी असते. हा असा उत्साही मेळावा पाहून आम्हा खेळाडूनासुद्धा खेळण्यासाठी उत्साह येतो. अगदी खरं सांगतो.

भारतात दौऱ्यावर असताना क्रिकेटपटूला खूप शिकायला मिळतं. मला आठवतंय् १९४९ च्या ऑक्टोबरमध्ये मी जेव्हा प्रथमच मुंबईला गेलो होतो त्यावेळी मुंबईमधील रंगीबेरंगी वातावरण पाहून मी दिपून गेलो होतो. सगळंच कसं उत्साहवर्धक आणि भूल पाडणारं. माझ्या सबंध दौऱ्यात एक गोष्ट मला प्रकर्षाने जाणवली. ती ही की येथील बहुसंख्य प्रेक्षक हे वागणुकीत व बोलण्याचालण्यात आदबशीर आहेत. परंतु क्रिकेटच्या खेळाची मजा लुटताना ह्या आदबशीरपणाचा मागमूसही नसतो. कोणत्याही खेळाचा आनंद लुटताना खरं म्हणजे ही अशीच वृत्ती हवी.

१९४०-५० च्या दरम्यान भारतीय संघात जे श्रेष्ठ खेळाडू होते त्यांचा खेळ आठवून मला अजूनही मनापासून आनंद होतो. विजय हजारे, विनू मन्कड, दत्तू फडकर, मुश्ताक अली, विजय मर्चंट, हेमू अधिकारी एकाहून एक वरचढ. त्यांच्या खेळातील रुबाब, शौर्य आणि मर्दुमकी वाखणण्यासारखी होती. संघात इतके चांगले खेळाडू असूनही भारतीय संघ त्यावेळी विशेष चमकला नाही ह्याला कारण संघात अभावाने तळपणारा संघटीतपणा. संकुचीत वृत्ती व पूर्वग्रहदुषीत वातावरण हे ह्या दोषाला प्रमुख ठरावेत.

ह्या त्यावेळच्या फलंदाजांची कुठल्याही आधुनिक संघाबरोबर तुलना केली तर असं खचित म्हणावं लागेल कीं त्याकाळचा भारतीय संघ केव्हाही श्रेष्ठ ठरावा. अर्थात् ही तुलना फलंदाजीपुरती मर्यादित आहे. हल्लीच्या भारतीय संघात एखाद-दुसरा 'जिनियस' आढळतो पण त्याची ही श्रेष्ठता फार काळ टिकणारी नसते असं अनुभवाने म्हणावं लागतं. इतकं असूनही हल्लीचा तरुण भारतीय क्रिकेट खेळाडु क्षणाक्षणाला क्रिकेट 'जगत' असतो; म्हणजे काय कीं त्याने क्रिकेटचा सारखा ध्यास घेतलेला असतो. ह्या अशा वृत्तीमुळे क्रिकेट ह्या खेळात फार लवकर प्रगती करता येते हे निर्विवाद होय. मला असं सांगण्यात आलं कीं भारतात क्रिकेट भरपूर खेळलं जातं—जितकं ऑस्ट्रेलिया-इंग्लंडमध्ये खेळलं जातं तितकं!

इतकं सगळं असून भारतीय क्रिकेट-संघ परदेशी यशस्वी कां होत नाही? आंतरराष्ट्रीय कीर्ति ज्याना प्राप्त झाली आहे, अशा खेळाडूत भारतीय खेळाडूंची संख्या कमी कां?









## 'क्रिकेट'मध्ये हेही घडतं....

मनःशांति न ढळू देणारा खेळ असा क्रिकेटचा लौकिक आहे का? १७७६ साली टिलबरी येथे केन्ट विरुद्ध इसेक्स् ह्या सामन्यात मतभेद झाल्यामुळे क्रीडांगणावर बाचाबाची सुरू झाली व तीन खेळाडूंचे मुडदे पडले!

☆ ☆ ☆

फलंदाज निरनिराळ्या तऱ्हेने बाद होऊ शकतो. पण फलंदाज बाद होण्याची ही तऱ्हेवाईक पद्धत पहा. १८७० साली ओव्हल येथे एका सामन्यात जे. साऊदर्टन नावाचा फलंदाज आपण बाद झालो असं समजून तंबूत परतला. पंचाने 'तू बाद झालेला नाहीस' असं परोपरीने सांगूनही तो 'क्रिज'वर परतला नाही. धावफलकात असं नमूद करण्यात आलं–जे. साऊदर्टन, निवृत्त, झेलबाद झालो असं स्वतःला वाटल्यामुळे,०.

☆ ☆ ☆

क्रिकेट महर्षि डब्ल्यू. जी. ग्रेस एका सामन्यात क्षेत्ररक्षण करीत होते. त्या दिवशीचा शेवटचा चेंडू फलंदाजाच्या 'पॅडस्' वर आदळला. एल्. बी. डब्ल्यू.साठी कोणीच 'अपील' केलं नाही. फलंदाजाला आश्चर्य वाटलं. संध्याकाळी ग्रेसशी गप्पा मारताना तो म्हणाला, 'तुम्ही कोणीच कसं 'अपील' केलं नाही? मी नक्कीच बाद झालो होतो. नशीबवान् आहे मी.' दुसऱ्या दिवशी सामना सुरू झाल्यावर पहिला चेंडू टाकण्यापूर्वीच ग्रेस जोराने ओरडला, 'हाऊज् दॅट?' ताबडतोब पंचाने कालच्या शेवटच्या चेंडूवर फलंदाजाला 'एल्. बी. डब्ल्यू.' म्हणून बाद दिले ! हल्लीच्या नियमानुसार कालचा निर्णय आज देता येत नाही! !

☆ ☆ ☆

हॅम्बलडनचा डेव्हिड हॅरीस हा एक निष्णात् फलंदाज होता. शेवटी शेवटी तो संधिवाताने आजारी झाला. तरीपण तो फलंदाजी कौशल्यपूर्वक करी; म्हणून जेव्हा जेव्हा तो फलंदाजी करीत असे तेव्हा तेव्हा एक भलीमोठी आरामखुर्ची 'विकेट'पाशी आणून ठेवण्यात येई. त्यामुळे चेंडू टाकल्यानंतर जो काही थोडाच वेळ मिळत असे त्या तेवढ्या वेळेतही तो आरामखुर्चीत शांतपणे आराम करी. षटक संपल्यावर अर्थात् तो आणखी शांतपणे पहुडे!

–गंमत्या

मला वाटतं कीं आंतरराष्ट्रीय खेळाडू होण्यासाठी काही वेगळ्या गुणांची आवश्यकता असावी व हेच मुख्यकारण असावं. प्रत्येक खेळाडूला मनोमनी असं वाटलं पाहिजे कीं कसोटी सामन्यासाठी काही वेगळं कौशल्य, काही वेगळा पराक्रम लागतो. आपल्याजवळ हे कितपत आहे? ह्याचा त्याने विचार केला पाहिजे. 'मी चांगला कसा खेळेन' हाच विचार सतत त्याच्या डोक्यात घोळला पाहिजे.

दौऱ्यावर असणाऱ्या खेळाडूने प्रथम अंगी संघटीतवृत्ती बाणली पाहिजे. दौऱ्यासाठी नेमलेल्या व्यवस्था मंडळाशी त्याने नेहमी संपर्क साधावा व वेळोवेळी सूचना कराव्यात. काही वेळा अशा सूचना मौलिक ठरतात. व्यवस्थापक मंडळानेसुद्धा दरवेळी शिस्तीचा बडगा दाखवू नये. अशाने खेळाडूंच्या मनावर नेहमी दडपण राहते व त्याचा परिणाम निश्चितपणे खेळावर होतो. दौरा सुरू होण्यापूर्वी वागणुकीसंबंधीचे नियम खेळाडूंना समजावून द्यावेत म्हणजे मग ह्या 'लक्ष्मणरेषे'च्या पलीकडे खेळाडू जाण्याचा संभव कमी. संघातील 'जुन्या आणि जाणत्या' खेळाडूंचा आदर्श नव्या खेळाडूने कधीही ठेवू नये कारण जुने खेळाडू वागणुकीत काही वेळा शिथिलता आणतात व नवे खेळाडू नेमके त्यांच्यासारखे वागायला गेले तर निश्चित फसतात.

व्यवस्थापक मंडळाची आणखी एक महत्वाची जबाबदारी म्हणजे प्रत्येक खेळाडूच्या मनात त्यानी असं ठसवून दिलं पाहिजे कीं तो आपल्या देशाच्या इभ्रतीसाठी खेळतो आहे व हे त्याने कधीही विसरू नये. ह्यामुळेच त्याच्या खेळात संकुचितपणाचा अभाव दिसला पाहिजे. असहकार वृत्ती ही अपयश लवकर मिळवून देते हे लक्षात ठेवावं.

पूर्वी ज्या भारतीय संघानी परदेश दौरे केले त्या संघांच्या व्यवस्थापक मंडळांची कोणती धोरणे होती हे मला ठाऊक नाही. काही वेळा संघटीतपणाचा अभाव पाहून असं वाटे कीं भारत सरकारचा ह्या व्यवस्थापक मंडळावर काहीच अधिकार नसावा कीं काय? तर काही वेळा संघाचा आगळा पराक्रम पाहून वाटे कीं ह्या संघाचा संघटीतपणा वाखाणण्यासारखा आहे.

भारतीय संघ आता पुढील वर्षी इंग्लंडचा दौरा करणार आहे तेव्हा किमानपक्षी भारतीय क्रिकेट नियंत्रण मंडळाने इतके तरी लक्षात ठेवावे कीं घरी उत्तम खेळणाऱ्या ह्या संघाकडून परदेशात काही विशेष कामगिरी अपेक्षित असेल तर दौऱ्यावरील व्यवस्थापक असा निवडावा कीं जो अभावितपणे खेळाडूंमध्ये ऐक्यवर्धक शक्ती निर्माण करील. ही एक कला आहे हे लक्षात ठेवलं पाहिजे. हा व्यवस्थापक जातीभेद व वर्णभेद निरपेक्ष असला पाहिजे हा प्रमुख गुण. ह्यामुळे आपली जबाबदारी तो व्यवस्थित पार पाडू शकेल.

तेव्हा पहिली गोष्ट म्हणजे असा 'सद्गृहस्थ' हुडकून काढला पाहिजे. दुसरे म्हणजे ह्या सद्गृहस्थाने खेळाडूंची अशी खात्री पटविली पाहिजे की 'मी निःपक्षपाती आहे' म्हणून! ! बस्, इतकं झाल्यावर पहा काय किमया घडते ती. आंतरराष्ट्रीय क्रिकेट–क्षेत्रात भारतीय संघाची दिंडी फार पुढे जाईल. ●●●



अनुक्रमणिका



**वेस्ट इंडीजचा वेगवान गोलंदाज ग्रिफीथ याच्या एका 'थ्रो' चेंडूने श्री. कॉन्ट्रॅक्टर जखमी झाल्यानंतर भारत संघाचे व्यवस्थापक श्री. गुलाम महमद व बार्बाडोस ज. हॉस्पीटलचे डॉ. हेरॉड फोर्डे हे त्याना मैदानातून सावरीत नेत आहेत.**

**वेस्ट इंडिजचा वेगवान गोलंदाज 'ग्रिफीथ' यांच्या एका 'थ्रो' चेंडूने डोक्याला जबर जखम झाल्याने ज्यांची अवघ्या २८ व्या वर्षी आंतरराष्ट्रीय क्रिकेट कारकीर्द अकाली संपुष्टात आली ते........**

# नरी कॉंट्रॅक्टर

**यांची क्रिकेट समितीला रोखठोक सवाल करणारी**

## प्रा. अविनाश केळकर

**यानी घेतली खास मुलाखत....**

**वेस्ट** इंडीजचा क्रिकेट संघ हा सध्या जगज्जेता संघ आहे. आपल्या संघाबरोबर त्याचे आता कसोटी सामने सुरू होणार आहेत. आजपर्यंत त्या देशाशी आपण एकूण वीस सामने खेळलो. परंतु एकाही सामन्यात आपण त्याला हरवू शकलो नाही. उलट त्या देशाशी झालेल्या अलिकडच्या दोन कसोटी मालिकेत आपला सपशेल फज्जा उडालेला आहे. त्यांच्या हॉल, गिलख्रिस्त आणि ग्रिफिथ या तुफानी गोलंदाजाना आपण आत्मविश्वासाने कधीच तोंड देऊ शकलो नाही. आम्हाला जलद्गती गोलंदाजी खेळता येत नाही. आमच्या देशात जलदगती गोलंदाज सोडाच पण दत्ता फडकर किंवा लाला अमर नाथ यांच्या दर्जाचे मध्यमगती गोलंदाजही आज उपलब्ध नाहीत. मंदगती-फसवे गोलंदाज हे आमचे हुकुमी एक्के ! पण विनु मन्कड, गुलाम अहमद आणि सुभाष गुप्ते या त्रयीच्या निवृत्तीनंतर प्रतीपक्षाला हा हा म्हणता बाद करून विजयश्री आपल्याकडे खेचून आणणारे कितीसे गोलंदाज आज आपल्यात आहेत ? वेस्ट इंडीज संघातील चार्ली ग्रिफिथ हा चेंडू फेकण्याच्या (chucker) पद्धतीमुळे आज आंतरराष्ट्रीय क्रिकेटमध्ये वादग्रस्त (controversial) गोलंदाज म्हणून प्रसिद्ध आहे. त्याच्या 'चकर'नेच चार वर्षांपूर्वी वेस्ट इंडीजमध्ये बार्बाडॉजच्या सामन्यात त्या वेळचे भारतीय संघाचे कप्तान नरिमन कॉंट्रॅक्टर याना मरणप्राय दुखापत झाली. त्यांच्या डोक्याला जबरदस्त आघात झाला. केवळ त्यांचे दैव शिकंदर म्हणूनच ते त्या जीवावरच्या आघातातून बरे झाले. परंतु त्या जीवघेण्या जखमेमुळेच त्यांची कसोटी सामन्यातील क्रिकेट कारकीर्द अकाली संपुष्टात आली. या प्रकरणात ग्रिफियची चूक असूनही वेस्ट इंडीजचे क्रिकेटबोर्ड त्याला दोषी ठरवायला तयार नाही. त्यांचे खेळाडू वेस्ली हॉल, रोहन कन्हाय, गेरी सोबर्स हे आपल्या पुस्तकातून ग्रिफीथचे समर्थन करतात. तो 'चकर' नाही. त्याचा तो चेंडू बंपर होता. कॉंट्रॅक्टर तो चुकविण्यासाठी खाली बसल्यामुळेच त्याना तो आघात झाला. अशी ते मल्लीनाथी करतात. भारतीय क्रिकेटपटूना जलदगती गोलंदाजी खेळताच येत नाही असे हिणवून त्या प्रकरणाचा सर्व दोष कॉंट्रॅक्टर यांच्या माथी मारतात. वेस्ट इंडीजचा त्यावेळचा कप्तान फ्रॅंक वॉरेल हा एक









सज्जन खेळाडू म्हणून प्रसिद्ध आहे. सामना सुरू होण्यापूर्वी, "सांभाळून खेळा वरं का, ग्रिफिथ हा "चकर" आहे" अशी मोठ्या साळसूदपणे आमच्या कप्तानाला सूचना देतो. पण आमचा कप्तान जखमी होताच मूग गिळून स्वस्थ वसतो याला काय म्हणावे ? याच्या विरुद्ध इंग्लंडचा माजी कर्णधार टेड डेक्स्टर, त्याने आपल्या पुस्तकात ("Dexter Declares") ग्रिफिथ हा "चकर" आहे असे स्पष्ट मत मांडले आहे. ऑस्ट्रेलियाचा कप्तान वॉवी सिंप्सन आणि यष्टिरक्षक वॉली ग्राउट यानीही असेच निर्भीड मत मांडले आहे. भारतीय संघाचे वेस्ट-इंडीज दौऱ्यातील व्यवस्थापक गुलाम अहमद आणि खेळाडू विजय मांजरेकर यानीही असेच मत प्रदर्शित केले. ऑस्ट्रेलियाचा खेळाडू नॉर्मन ओनील याने तर "यापुढे ग्रिफिथ ज्या सघांत असेल त्या संघाच्या विरुद्ध मी खेळणारच नाही" असे जाहीरपणे सांगितले. यासाठीच खुद्द नरी काँट्रॅक्टरना या प्रकरणासंबंधी भेटून त्यांचे या बाबतीत काय म्हणणे आहे हे समजावून घ्यायचे मी ठरविले. मी काही प्रथमच त्याना भेटत नव्हतो. त्यांचे एक वरिष्ठ अधिकारी, माझे मित्र श्री. क. र. मोंडकर यानी त्यांचा परिचय यापूर्वीच करून दिला होता. ठरलेल्या वेळी आमची मुलाखत सुरू होताच मी त्याना पहिला प्रश्न विचारला—

"आपल्याला क्रिकेटची आवड कशी निर्माण झाली ? आपल्यापुढे कोणते खेळाडू आदर्श होते ?"

काँट्रॅक्टरना आपले नासिकला गेलेले बालपण आठवले. नासिकच्या "नासिक बॉईज टाऊन स्कूल"मध्ये त्यानी क्रिकेटचे घेतलेले प्राथमिक धडे आणि त्यावेळचे त्यांचे बालमित्र यांचे त्याना स्मरण झाले. ते म्हणाले,

"माझे वडील जहांगिर काँट्रॅक्टर याना क्रिकेटचे विलक्षण वेड होते. त्यानीच माझ्या मनात क्रिकेटची आवड निर्माण केली. मी नासिक सोडून मुंबईला झेवियर कॉलेजमध्ये १९५० मध्ये आलो. त्यापूर्वीच मी खंडेराव रांगणेकरांचा नेत्रदीपक खेळ पाहिला होता. त्यांची शैली मला फार आवडे. तेही माझ्याप्रमाणेच डावखुरे फलंदाज होते ना ?"

"त्यावेळीही तुम्ही आघाडीवर फलंदाजीला जात असाल नाही?" मी उत्सुकतेने विचारले. माझा प्रश्न संपण्यापूर्वीच ते म्हणाले —

"पुष्कळाना तसं वाटतं. पण ते खरे नाही. कॉलेजच्या संघातून खेळताना किंवा गुजरात संघातून "रणजी टॉफी" साठी खेळताना मी कधीच आघाडीचा फलंदाज नव्हतो. मी मधल्या फळीत चार किंवा पाच क्रमांकावर खेळे. पण न्युझिलंड विरुद्ध दिल्लीच्या दुसऱ्या कसोटी सामन्यात (१९५५) माझी प्रथमच निवड झाली. त्या सामन्यात विनु मन्कड आणि पंकज रॉय ही भारताची नेहमीची आघाडीची जोडी खेळली नाही. कप्तान पॉली उम्रीगर याने मला 'आघाडीवर जाशील ना?' म्हणून विचारले. मी कबूल झालो आणि त्यानंतर मी आघाडीचा फलंदाज म्हणूनच खेळलो."

रणजी ट्रॉफीचा निर्देश होताच मी विचारले, "गुजरात संघातून बडोदे संघाविरुद्ध आपण पहिल्याच सामन्यात दोन्ही डावात शतके काढलीत आठवते ना ? पहिल्याच सामन्यात एक शतक काढणारे बरेच खेळाडू आहेत. पण पहिल्याच सामन्यात दोन्ही डावात शतके झळकावणारे आपण आणि ऑस्ट्रेलियाचे ऑर्थर मॉरिसच."

काँट्रॅक्टरनी आपला क्रिकेटचा आल्बम काढला. त्यात प्रत्येक सामन्याचा त्रोटक अहवाल होता. तो संग्रह माझ्यापुढे ठेवीत ते म्हणाले,

"तुमचे म्हणणे खरे आहे. मी वडोदे संघाविरुद्ध १५२ आणि नाबाद १०२ धावा काढल्या. (१९५२–५३). आर्थर मॉरिसने न्यूसाउथ वेल्ससाठी क्वीन्सलंड संघाविरुद्ध सिडने येथे १९४०–४१ साली १४८ आणि १११ धावा काढल्या. आम्ही दोनच खेळाडूनी हा विक्रम केलेला आहे."

काँट्रॅक्टरनी क्रिकेट विषयक वरीच पुस्तके वाचली आहेत. अभ्यासली आहेत. हे कळताच मी त्याना विचारले,

"भारतीय संघावद्दल परकीय टीकाकार आणि खेळाडू तुच्छतेने लिहितात. कधी उपरोधिकपणाने तर कधी अनुल्लेखाने आपल्याला मारतात. हे डेक्स्टरचे नवे पुस्तक पाहा. आपण चार वर्षांपूर्वी त्याच्या संघाला कलकत्ता आणि मद्रास येथे पराभूत केले. त्याचा परामर्श तो चार ओळीत घेतो आणि लिहितो की नाणेफेक हरल्यामुळे इंग्लंडचा पराभव झाला. तुमचे या बाबतीत काय म्हणणे आहे सांगा ना."

काँट्रॅक्टरनी आपला क्रिकेटचा आल्बम चाळला. एक कात्रण माझ्यापुढे ठेवीत ते म्हणाले,

"आपला संघ इंग्लंडला गेला (१९५९) त्यावेळी आमच्यावर इंग्लीश वृत्तपत्रानी प्रखर टीकास्त्र सोडले. नामुष्की केली. आम्हाला Dull Dogs म्हटले. आणखी किती विशेषणे आहेत ती पाहा. तुमच्यासारख्या वाचकाना जर ती टीका झोंबत असेल तर प्रत्यक्ष आम्हा खेळाडूना किती वाईट वाटत असेल याची कल्पना करा. परकीय खेळाडू आणि टीकाकार आपल्या पुस्तकातून आमच्यावर तुच्छतेने टीकास्त्र सोडतात. आपल्या संघाला कमी लेखतात हे मी नेहमीच वाचतो. मनात व्यथित होतो. पण याबाबतीत आम्हालाही स्वाभीमान आहे. डेक्स्टरचा संघ भारतात आला त्यावेळची गोष्ट. पहिला सामना सुरू होण्यापूर्वी क्रिकेट क्लब ऑफ् इंडियाच्या वतीने मुंबईला सत्कार समारंभ झाला. त्यावेळी दोन्ही संघाचे खेळाडू आणि प्रतिष्ठित निमंत्रित होते. मी माझ्या भाषणात त्याचा उल्लेख केला आणि सांगितले, "आपण इंग्लंडला गेलो त्यावेळी आपल्याला "डल डॉग्ज" म्हणून हिणविण्यात आले. आता आपल्याला संधी मिळाली आहे. खरोखरच भारतीय क्रिकेटपटू हे "डल डॉग्ज" आहेत की इंग्लिश खेळाडू "डल डॉग्ज" आहेत हे आपण जगाला पटवून देऊ या. आणि त्याचा परिणाम म्हणजे आपण त्या संघाला दोन सामन्यात हरवून "रबर" मिळविले."

"पण डेक्स्टर म्हणतो की नाणेफेक हरल्यामुळे..."

"कळलं. डेक्स्टरच्या म्हणण्यात थोडासा तथ्यांश आहे. नाणेफेकीचा परिणाम होतो. अर्थात नाणेफेक जिंकणे किंवा हरणे यात दैवाचा भाग आहे. परंतु आम्ही इंग्लंडला हरविले ते सांघिक वळावरच.





अनुक्रमणिका

मांजरेकर, उम्रीगर, जयसिंहा, पतौडी, बोर्डे, दुराणी साऱ्यानी प्राण पणाला लावून जलद धावा काढल्या आणि धावांचे डोंगर रचले. दुराणी आणि बोर्डे यानी गोलंदाजीची कमाल केली. आमचे क्षेत्ररक्षण, यष्टिरक्षण सर्वच उत्कृष्ट होते. शिवाय, आम्ही संघ (Team) म्हणूनच खेळलो आणि विजयश्री खेचून आणली."

"इंग्लंडच्या खेळाडूना लेग स्पिन खेळता येत नाही असे म्हणतात. खरे काय ?" मी उत्सुकतेने विचारले.

"त्याचे असं आहे. इंग्रज खेळाडू गोलंदाजांच्या हाताच्या आणि आविर्भावाकडे पाहून खेळत नाहीत. तर चेंडूचा टप्पा पडल्यावर त्याच्या गतीकडे पाहून फलंदाजीसाठी पवित्रा घेतात. म्हणून बोर्डेची गोलंदाजी त्याना आत्मविश्वासाने खेळता आली नाही. त्यांचा पराभव झाला. इतर देशातील खेळाडू आणि आम्ही भारतीय खेळाडही गोलंदाजाच्या हाताच्या आविर्भावाकडे पाहून खेळतो. हा त्यांच्या व इतरांच्या खेळण्यातील फरक आहे."

"जगातील इतर नामांकित कप्तान ब्रॅडमन किंवा वॉरेल हे सामना सुरू होण्यापूर्वी प्रतिपक्षीय फलंदाजाना बाद कसे करावे याची आपल्या प्रमुख गोलंदाजांशी चर्चा करीत. सल्ला मसलत घेत. संघाच्याही बैठका घेत. आपण अशा बैठका घेत असाल नाही ?" मी विचारले.

कॉंट्रॅक्टरनी आमच्या टेबलावर त्यांच्या पत्नीने आणून ठेवलेला चहा घेतला. माझ्या हाती एक प्याला देत ते म्हणाले,

"मीही अशा बैठका सामना सुरू होण्यापूर्वी घेत असे सर्व खेळाडूंशी चर्चा करी. प्रमुख गोलंदाजानाही विचारी. इतकेच नव्हे तर दर दिवशी सामना संपल्यावर आम्ही चर्चा करीत असू. पण या चर्चांचा फायदा झाला तरी अखेर शेवटी अंतिम निर्णय कप्तानालाच घ्यावा लागतो."

"एखादं उदाहरण द्याल का ?" मी आतुरतेने विचारले. त्यानी आपल्या संग्रहातील एक कात्रण माझ्यापुढे ठेवले. "कलकत्त्याचा डेक्स्टरच्या संघाबरोबर झालेला आपला सामना आठवा. त्यांच्या दोनशे धावा झाल्या होत्या. सहा गडी बाद झाले होते. आता नवा चेंडू घ्यावा असे सर्वानुमते ठरले. मी पंचाकडे नव्या चेंडूची मागणी केली. रमाकांत देसाईलाही बोलाविले. पण माझ्या मनात काय बदल झाला कुणास ठाऊक. मी आयत्या वेळी बेत बदलला. जुनाच चेंडू वापरायचे ठरविले. आणि दुराणी आणि बोर्डे यांच्या गोलंदाजीवर अवघ्या बारा धावात उरलेले चार खेळाडू, (त्यात डेक्स्टरही होता) बाद झाले" कॉन्ट्रॅक्टर हसत हसत म्हणाले.

"आता आपण वेस्ट इंडीजकडे वळू या. आपल्याला बार्बाडॉजच्या सामन्यात ग्रिफियचा चेंडू लागला आणि आपण जखमी झालात. हा ग्रिफिथ 'चकर' आहे का हो ?"

"मला त्याच्या दहाव्या चेंडूने जखम झाली. तो चेंडू फेकतो की नाही हे मला स्पष्टपणे सांगता येणार नाही. कारण जो फलंदाज गोलंदाजाच्या जवळ उभा असतो तोच त्याबाबत सांगू शकेल. खेळणाऱ्या फलंदाजाला ते सांगणे कठीण आहे. मी मुंबईचा लवकरच

'कष्ट, हाल हे अपुले भाई' मानणारे—

# कै. अनंत बाळकृष्ण अंतरकर



माती मातीला मिळाली. आत्मा पंचत्वात विलीन झाला. उत्पत्ति आणि लय यांच्यातली स्थिति संपली. 'गति' सरली. मति मलीन झाली, कृति 'शून्य' काय झाली. अनंत बाळकृष्ण अंतरकर ह्या नावाने मराठी साहित्याच्या कालच्या आणि आजच्या वाचकाला चांगले परिचित असलेले व्यक्तित्व काळाने गिळून टाकले. हंस–मोहिनी–नवलचे त्रिविध 'नवल' प्रथमच मराठीचिये नगरी स्वतःच्या कर्तृत्वाने घडवून आणणारे 'संपादक' अंतरकर मासिकाना व मराठी वाचकाना अंतरले. कुटुंबियांचे 'अण्णा' गेले. ज्या दिवशी ते घरी येणार म्हणून सारी तयारी केली होती त्याच दिवशी एका अति सामान्य (वाटणाऱ्या) पण त्यांचे आयुष्यच गिळून टाकणाऱ्या ऑपरेशनमुळे ते 'सदेह' घरी परत् शकले नाहीत. आत्मविश्वासाने बोलणारी, मोठमोठी स्वप्ने पाहणारी आणि ते साकार करण्यासाठी अविश्रांत धडपडणारी एक कृश व विकलांग काया पंचत्वात विलीन झाली. अंतरकर गेले. संपादक अंतरकर गेले. वाचकांच्या अपेक्षा वाढविणारा पण 'संपादनात' ज्याचा अपमृत्यु झाला असा महाराष्ट्राचा एक विनोदी लेखक अनंत बाळकृष्ण अंतरकर काळाने आकस्मिकपणे टिपून नेला. माणसे अशी येतात आणि जातात. किंबहुना कधीतरी जाण्यासाठीच येतात. पण येणे आणि जाणे यात राहणे. करणे. 'यशवंत' होणे. कीर्तिवंत होणे, काळाच्या विशाल भूधरावर 'निजनामे' स्वकर्तृत्वाने खोदणे वगैरे बऱ्याच गोष्टी असतात. आणि अखेर माणूस मोजला जातो तो त्याच्या ह्या मधल्या 'असण्या'तल्या व करण्यातल्या घटनांवरूनच!

'अनंत बाळकृष्ण अंतरकर' गेले नाहीत. संपादक अंतरकर मेले नाहीत. विनोदकार अंतरकर अजूनही आहेत. 'गृहस्थ' अंतरकरही अजून आहेत. स्वाभिमानी, साक्षेपी, कष्ट हाच देव मानणारे, हाडाचे चिवट अंतरकर अजूनही आपल्यातून गेले नाहीत. अशी माणसे मरत नाहीतच. ही माणसे जी स्वप्ने पाहतात ती स्वप्नेही मरत नाहीतच. कारण ती स्वप्ने त्याली असतात कल्पकतेची लेणी.

ध्याली असतात त्या स्वप्नाळू माणसाची रुधिरे, त्यानी घेतले असतात अपार कष्ट, पाहिला असतो घाम! साज घातला असतो त्या स्वप्नाळू माणसांच्या बुद्धीचा! शिरताज असतो त्यांच्या ध्यासांचा! अंतरकर ह्या माणसाने सत्यकथा—वसंतच्या कार्यालयात बसून स्वप्ने पाहिली हंस-मोहिनी-नवलची! आणि मग त्या स्वप्नांच्या मागे ते आयुष्यभर धावत राहिले. खपले त्यासाठी, झिजले त्यासाठी आणि गेलेही त्याचसाठी ! कारण अंतरकरांजवळ 'स्वप्ने' पाहण्याची ताकद होती. ती घेऊनच 'हंस'चा संसार उभा राहिला. त्यावेळच्या त्यांच्या संसारातच 'हंस'ची 'भागीदारी' होती. घरमालकावरच सारे खर्च लादणारा तो 'पेइंग गेस्ट' होता. गोरेगावकरांच्या चाळीतल्या लहानशा जागेत त्यानी त्या स्वप्नांचा देव्हारा ठेवून दिला. त्या अडचणीतही ते पूजा बांधीतच राहिले. कारण 'कष्टेविण फल नाही । कष्टेविण राज्य नाही । केल्याविना होत नाही । कार्य काही । हा समर्थ संदेश मनात वागविणारे व 'आधी केलेचि पाहिजे' म्हणून कामाला लागणारे अंतरकर होते! 'केल्याने होत आहे रे' ह्याचा प्रत्यय त्यांच्या आजच्या टिळकरोडवरील कार्यालयाचा प्रचंड व्याप पाहिला की येतो. संपादनाचे काम मानले तर सोपे पण केले तर किती मोठे होते वा असते त्याचा पुरावा म्हणजे अनंत अंतरकर! मराठीतल्या कित्येक नवीन नवीन कल्पनांचे जनक ते होते.

'तीन मासिकां'ची कल्पना अंतरकरांचीच. मोहिनीवर चित्रकार शि. द. फडणीस ह्यांची 'हंसरी गॅलरी' येऊ देण्याची कल्पना त्यांचीच! तीन मासिके काढली तीही उगीच काढली नाहीत. त्या तीन्ही मासिकांची 'प्रकृति' त्यानी वेगळी राखली. त्याना स्वतःचे असे व्यक्तित्व दिले. 'नवल'ची कल्पनाही मराठीत त्यांचीच ! जाहिरातींविना अंक 'यशस्वी' करण्याची किमया अंतरकरच करू जाणे ! दवाखान्यात जाईपर्यंत आणि गेल्यानंतरहि ते चिंता वाहत होते मासिकांची ! 'दिवाळी अंक' अगदी अंगावर आले होते. शरीर थकले होते पण मन मात्र 'सतेज' होते. पण यंदाचे दिवाळी अंक संपादक 'अनन्त अन्तरकर' म्हणून निघावेत अशी नियतीची इच्छा नव्हती. त्याआधीच तिने अचानक झडप घातली. मराठीतला एक कर्तबगार, गुणी, साक्षेपी, कष्टाळू, मनमिळाऊ, नवे नवे हुडकणारा, देणारा, पुन्हा नव्या नव्याच्या शोधात भटकणारा एक ध्येयरत संपादक आपल्यातून निघून गेला आहे. सत्कृत्याने सद्गति मिळते म्हणतात. मग अनंत बाळकृष्ण अंतरकर ह्या सद्गृहस्थाला ती मिळाली असलीच पाहिजे.

आम्ही अंतरकर व 'हंस' कुटुंबियांच्या दुःखात सहभागी आहोत. ईश्वर मृतात्म्यास सद्गति व शांति देवो.

— संपादक

होणारा वेस्ट ईंडीजबरोबरचा कसोटी सामना पाहिला आणि त्यात ग्रिफिथ खेळला तर याबाबतीत निश्चितपणे सांगू शकेन."

"पण कन्हाय–हॉल प्रभृती त्यांचे खेळाडू तुम्हाला दोषी ठरवितात त्याचे काय ?" मी म्हणालो.

"ग्रिफिथचा चेंडू मला दिसला नाही. डोक्याला जखम झाली. त्यानंतर मी बॅटीने चेंडू पुढे ढकलला आणि वेदना तीव्र झाल्यामुळे खाली बसलो. मग हंट, सुर्ती वगैरे खेळाडू मदतीला आले. माझ्या जीवावरचा आघात होता तो. मात्र तो चेंडू "बंपर" होता, त्याला चुकविण्यासाठी मी खाली बसलो, त्यामुळे मला जखम झाली असा अपप्रचार हॉल, कन्हाय प्रभृती त्यांचे खेळाडू आपल्या पुस्तकातून करतात हे संपूर्ण खोटे आहे. आपल्या खेळाडूचे समर्थन करताहेत ते. मी फक्त चेंडू दृष्टिसमोर दिसताच मान किंचित् फिरविली हे सत्य आहे," कॉंट्रॅक्टर अभिनिवेशाने पण आत्मविश्वासपूर्ण सांगत होते. त्यांच्या मनश्चक्षूसमोर तो प्रसंग मूर्तिमंत उभा राहिला. त्यानी प्रात्यक्षिक करून तो प्रसंग समजावून दिला. त्यांचे संभाषण थांबलेलं पाहाताच त्याना बोलते करण्यासाठी मी म्हणालो,

"मग हा डेक्स्टर आपल्या आत्मचरित्रात सांगतो की वॉरेलने सामना सुरू होण्यापूर्वी याची तुम्हाला कल्पना दिली होती हे खरे काय ?" मी डेक्स्टरच्या पुस्तकातील ते पान काढून त्यांच्यासमोर ठेवले. त्याच्यावर नजर टाकून ते म्हणाले,

"डेक्स्टरची माझी भेट झाली होती. वॉरेलने ग्रिफिथ हा चेंडू फेकतो याची मला सूचना दिली होती हेही खरे आहे. परंतु मी त्या भेटीच्या वेळी चांगल्या मनःस्थितीत नव्हतो असे डेक्स्टर लिहितो हे बरोबर नाही."

"पण ग्रिफिथ प्रत्येक षट्कात चेंडू फेकतो का हो ?"

"ज्या अर्थी आमचे खेळाडू, डेक्स्टर किंवा सिंप्सन, ग्राऊट असे अनेक खेळाडू जाहीररीत्या तो चेंडू फेकतो असे सांगतात त्याअर्थी तो चेंडू फेकीत असावा असे मलाही वाटते. ऑस्ट्रेलियाच्या खेळाडूंनी त्याच्या गोलंदाजीची फिल्म घेतली आहे म्हणे. मात्र हे "चकर" गोलंदाज प्रत्येक चेंडू फेकून टाकतात हे खरे नाही. दोन तीन षट्कातून एखादाच चेंडू फेकतात. आपल्या फायद्यासाठी. कारण त्यामुळे त्या चेंडूला विलक्षण गती मिळते. चेंडू अनपेक्षितपणे उसळी घेतो. त्यामुळे फलंदाज चकतो. कधी त्यामुळे जखमा होतात. तर कधी अनपेक्षितरीत्या फलंदाज बाद होतात. असे सांगतात कीं ज्यावेळी ग्रिफिथ अशा प्रकारे चेंडू फेकतो त्यावेळी त्याच्या चेंडूचा वेग हॉलपेक्षाही जास्त असतो. एरव्ही तो मध्यमगती गोलंदाज आहे." कॉंट्रॅक्टरनी 'चकर' म्हणजे काय ह्याचे आपल्या घरी मला प्रात्यक्षिक करून दाखविले. त्यानंतर मी म्हणालो, "वेस्ट इंडीजच्या मागील दौऱ्यावर आपला संघ पाचही सामन्यात पराभूत झाला याची कारणे सांगाल का ?" त्यानी आपली फाइल पुन्हा चाळली. काहीसा विचार करून ते म्हणाले,

"त्याचं असं आहे, कन्हाय आपल्या पुस्तकात भारतीय फलंदाजाना द्रुतगती गोलंदाजी खेळता येत नाही असे हिणवितो हे संपूर्ण सत्य

[ पृष्ठ ४८ वर पहा ]

# बोऽऽऽला-अमृत बोऽऽऽला

**गाणे** सुरू झाले, केव्हां आणि संपले केव्हा—कळलेच नाही. वाटलं हे गाणं संपूच नये. पुन्हा पुन्हा सुरू व्हावं. वन्समोअरचा जमाना संपला. वन्समोअर घेणारे गायक संपले. त्यांच्या गाण्याने बेहोष होऊन वन्समोअरचा अक्षरशः पाऊस पाडणारे 'दाद' देणारे रसिकही संपले—पण छे:! कधी तरी असे दुर्मिळ 'योग' येतात आणि मग मन घुटमळत राहतं त्या सुरात—त्या गाण्यात—त्या अभिनयात ! 'कुलवधु' नाटक रंगभूमीवर आलं. गाजलं—त्यातली गाणी घराघरातून 'भाग्याचे क्षण' घेऊन गेली. 'मधुसूदन' घरोघरी नाचले—बागडले. भानुमती घरातून बाहेर पडली. पण घराघरातून तिचे स्वागत झाले. ती 'बेघर' कधी झालीच नाही. अजूनही ती नाटकात दिसली नाही तरी तिचे सूर मात्र सुरांचे वेड असणाराना मधुन मधुन भेटतात. मग त्यांच्या तोंडून उद्गार निघतात, "क्षण आला भाग्याचा!"

'हिज मास्टर्स व्हॉईस'च्या कार्यालयात त्या संध्याकाळी अशीच भाग्याची बरसात झाली. सायंकाळी सहाची वेळ! नाटककार मो. ग. रांगणेकर, गायिका ज्योत्स्ना भोळे—संगीतकार मास्तर कृष्णराव, मुंबईच्या कार्यालयाचे रामा अय्यर सोहनी, जी. एन्. जोशी ही मंडळी जमली होती. पत्रकारांच्या साक्षीने एक नवा प्रयोग सादर होत होता. 'कुलवधु' नाटकाची ४५ मिनिटांची एक रेकॉर्ड मराठी नाट्य-संगीत रसिकांसाठी कंपनीने त्यादिवशी सादर केली. मी ते नाटक अनेकवेळा पाहिले आहे. त्यातली गाणी (उगीच स्वतःशीच व स्वतःसाठीही) गुणगुणलो आहे पण गोडी म्हणजे गोडी! मास्तर कृष्णराव तर म्हणालेच "अमृत बोला—भाई अमृत बोला" त्या नाटकातल्या गाण्यांबद्दल अमृतच बोललं पाहिजे. ४५ मिनिटांचं ते नाटक मी ऐकलं. त्याचं संकलन खुद्द रांगणेकरांनीच केलं होतं. त्यामुळे 'अन्याय झाला हो' म्हणून ओरडायची सोय नव्हती. ज्योत्स्नाबाई भोळे व अविनाश हीच जोडी 'रेकॉर्ड'मध्येही असल्याने नाटक रंगलं. गाणी निवडक (व लोकप्रिय झालेली) असल्याने 'मेहफिल' मोठी रंगतदार झाली. एच्. एम्. व्ही. आता आणखी काही नाटकं 'रेकॉर्ड' करणार आहे—अर्थात तुम्ही आम्ही पसंतीचं 'रेकॉर्ड' केलं तर ! चांगल्या उपक्रमांना चांगली (व सक्रिय) दाद देण्याची आपली प्रवृत्ति वाढली पाहिजे राव ! ती नसल्याने 'काबुलीवाला' जातो पेटीत आणि 'लव् इन सिमला, टोकियो,' 'काश्मीर' सारखी चित्रे ठरतात 'हिट्'! ज्यांना 'शूट' करायचं त्यांना करतात आपले लोक 'हिट्' आणि ज्यांना 'हिट्' करायचं त्यांना सांगतात 'क्विट्'! छोडो यार ! अखेर चांगल्याला चांगलं म्हणायला शिका ! त्याआधी चांगलं काय ते ओळखायला शिका. त्याआधी चांगलं काय ते ठरवा. अखेर 'पोस्टवॉर' जनरेशनला आपण हे नीट सांगितलं नाही आणि मग बांधा आला दिल्लीत! खैर जाने दो! 'कुलवधू' ची रेकॉर्ड ऐका आणि मग बोलाऽऽऽअमृत बोऽऽऽला!



## असे पाहिले असे ऐकले

# उदंड जाली लेकुरे

### (लूपवाले होशियार !!)

आता चांगल्याला चांगलं म्हणण्यावरूनच विषय निघाला. पण चांगलं काय, वेगळं काय, आगळं काय, प्रयोग कुठला आहे. त्यातलं नवं काय आहे हे समजून घेतलं तर चांगल्याला चांगलं म्हणणं संभवतं—कसं ? खूपशा मुलाबाळांच्या बाळलीला पहायला मिळतील म्हणून थेटरात जाऊन बसलो. ('घरी काय कमी मिळतात?' इति सौ.) पडदा वर गेला पण स्टेजवर माणूस नाही—आता उदंड लेकरे येणार केव्हा आणि बघणार केव्हा ? पण नाटकात ती आली (आणि आल्यावाटेने परत गेली—त्यांच्या लीला मात्र पुतळ्याच्या मिशा, भिंतीवरचे वाङ्मय, उलटे सुलटे टांगलेले कपडे. फाटलेली मासिके यावरून ध्यानी आल्या. पोरं इथुन तिथुन सारखीच हेही ध्यानी आले व घरच्या पोरांवरचा राग कमी झाला) प्रा. वसंतराव कानेटकर मोठा सव्यसाची माणूस ! हुन्नरी, प्रयोगशील, यशापयशापेक्षांही कलेला, प्रयोगाला, नवतेला उद्यमशीलतेला मोठं मानणारा ! रांगणेकरांसारखा मुरब्बी व कसबी दिग्दर्शक, गोवा हिंदु असो-सारखी मातबर संस्था ह्यामुळे अपेक्षा मोठ्या उंचावलेल्या. गद्यकाव्यांचा एक वेगळाच प्रयोग केलेला असल्याची कळलेली, 'अंदरकी बात—' जाऊन बसलो. नाटक पाहिलं—आतां नाटक पाहिलं असं म्हणणं रुढार्थाने खरं नाही. प्रयोग पाहिला. नाटकाच्या सांकेतिक चौकटीत न बसणारा; नवा आणि आल्हादक!! वास्तविक नाटकाला कथा वगैरे हवीच—नाही का ? तशी ती इथे आहेही —थोडीशी—मामुली—थोडक्यात म्हणजे तशी कथा नाही. "संघर्षाशिवाय नाट्य नाही" म्हणणाराना इथे तसा मोठा मूलगामी संघर्षही नाही. अरे, मग आहे काय? गंमत जंमत—इथे माणसे आहेत. त्यांचे 'मानवी' स्वभाव (गुण दोषात्मक) आहेत. आता मूल नाही म्हणून पैशाच्या स्वार्थी लोभाने माणसे नको तेव्हा व नको तितकी जवळ येतात ह्यात सारे 'मानवी' व स्वाभा-







विक आहे. आणि 'वारस' येणार म्हणताच ती 'रस्ता' सुधारतात हेही स्वाभाविकच! यांत कानेटकरानी नवीन काय सांगितले—ह्यात नाट्य कुठे? म्हणून लोक विचारतात. ह्यात 'नाट्य' नाही. संघर्ष नाही हीच तर खरी गंमत! पण त्यासाठी त्रिमिति पटासाठी जसे उपनेच लावावे लागतात ना तसेच लावले पाहिजेत, बरं का ! नाटकाच्या 'पुणेरी' पगड्या आणि सांकेतिक 'पोथ्या' इथे फारशा उपयोगी पडणार नाहीत. तसं अपेक्षाभंग आणि पूर्ति ह्या दोन टोकांत हे नाटक फिरतं. आणि अपेक्षाभंगातून जसे दुःख (व त्यातून विनोद) निर्माण होतो—तसाच विनोद अपेक्षापूर्तीतूनही होतो. सुप्रसिद्ध संगीत दिग्दर्शक होण्याची स्वप्ने पाहणारा राजा, मूल नसल्याने व्याकुळलेली पण फुलांवर प्रेम करणारी मधुराणी, त्यांच्या निपुत्रिकतेवर निर्भर राहणारी तिची बहीण व त्याचा भाऊ, शेवटी येणारा डॉक्टर, बहिणीचा नवरा आणि भावाची बायको. वटिंगण गुरुजी ह्या साऱ्या माणसांत घडते गंमत! पाहण्यासारखी, ऐकण्यासारखी, अनुभवण्यासारखी! ह्या नाटकांत अनेक गोष्टी आहेत. चित्रपट व्यवसायांतील कांही गोष्टींचे विडंबन, उपहास आहे. कारुण्य आहे. विनोद आहे. काव्यात्मता आहे. हळुवारपणे छेडलेले मनाचे भाव आहेत. 'गद्य काव्ये' आहेत. फॅडसुचेही विडंबन आहे—फक्त 'गंभीर नाटक' पहायला, बोध घ्यायला आपण जातो आहोत ह्या भूमिकेचे 'सोवळेभांडे' थेटरच्या दाराशीच ठेवले पाहिजे. इथे रायगड दिसत नाही म्हणून ओरडण्यात काय अर्थ? मूळ भूमिकाच भिन्न आहेत. इराण्याच्या हॉटेलात जाऊन बिर्याणीऐवजी मिसळ नाहीतर डोसा मागण्याचाच हा प्रकार आहे. गद्यकाव्ये मोठी आहेत. पण त्यातून प्रेक्षक व रंगमंच यातलं अंतर कमी करण्याचा प्रयोग नवा आहे. क्वचित प्रसंगी तो थोडा कंटाळवाणाही होतो. पण पुष्कळदा (नटाना नको इतकीही) दाद तो देऊन जातो. संगीताचा साज मोठा चांगला चढवला आहे जितेंद्र अभिषेकींनी! 'साहेबी' स्वर जरा जास्त झाले का हो ? का आपलं हे नव-संगीत म्हणायचं ? घ्या! ज्याचं त्याने पारखून घ्यावं.

श्रीकान्त मोघे हा मोठा गुणी अभिनेता! हा शब्द जाणून बुजून वापरलाय्! मोघ्यांच्या बहुतेक साऱ्या भूमिका पाहिल्या आहेत—म्हणून म्हणतो. ह्या माणसाला 'अभिनय' आहे 'ताजेपणा' आहे. भूमिका 'सजीव' करण्याचे कसब आहे. आपल्याला 'बोलका' राजा आवडला. 'राणी' मोहक वाटली. अभिनय 'बोलका' वाटला. मराठी रंगभूमीला एक नवी अभिनेत्री मिळाली आहेसे वाटले. भिकु पै आंगले, भोलाराम आठवले, विठ्ठल पणदुरकर व 'डॉक्टर अष्टपुत्रे' हे खरे मानकरी!! त्यांतल्या त्यात शेवटचे दोघे अप्रतिम! विसरणे कठिण! ते मुळी अभिनय करीत नव्हतेच—त्या त्या भूमिका जणुं जगतच होते—मला एक गोष्ट जाणवली—लिहून टाकतो झालं! साऱ्या पात्रांना 'फार्सिकल' टच् दिलाय् तो हवाच होता काय? गड्यांपासून ते डॉक्टरपर्यंत! पण 'एकूण नाटकाचे दिग्दर्शन' एवन्!' ह्याविषयावर साऱ्याच—प्रेक्षकांचं, 'एक मत' दिसलं. (असं अलिकडे क्वचित घडतं. कलेच्या क्षेत्रांत तर फारच क्वचित्) अशा तऱ्हेच्या सुखात्मिका उत्तम बसविणे ही रांगणेकरांची स्पेशॅलिटी! ते यश मोठे. स्मरणात राहील असे. ज. के. उपाध्ये यांची कविता व त्यावेळचा प्रवेश हा ह्या नाटकांला 'सुंदर' भाग (श्रवणीय व प्रेक्षणीयही) त्या कवितेची चाल गुणगुणत रहावी अशी—मोघे म्हणतातही छान!! अखेर हा एक 'नवा प्रयोग' आहे. अशा प्रयोगातूनच कला विकसित होत जाते—नाही का? (फार गंभीर होतंय् का हे? जरा लाइटली घ्या—ते नाटक आणि हे परीक्षणही)

## आकाशवाणी मुंबई केंद्र:

आता रेडियोला सकाळी सहापासून रात्री अकरा साडे अकरापर्यंत कार्यक्रम द्यावे लागतात. केवढा ताप आणि केवढा व्याप! येऊन पहा म्हणजे समजेल (नको! नको!! तूर्त नको—आणीबाणी आहे ना?) आता सारेच कार्यक्रम कुठून चांगले देणार! एवढ्या थोड्या पैशात चांगले लोक चांगले कार्यक्रम देणार कुठून? अरे, म्हणून काय 'मुखशुद्धी?' काय झालं काय, म्हणता? तुम्ही एकता का कधी मुखशुद्धी? मागे तुतारी गरजत होती. तीत काय काय मसाला असायचा महाराजा—लूपपासून तो जिल्हा परिषदांपर्यंत! खरं सांगायचं तर सूर्याखालचं सारं काही! ताश्कंद करार झाला शास्त्री गेले. जिकलेली ठाणी गेली. सेना हात हलवीत परत आल्या. तुतारी वाजवण्यासारखं काही उरलच नाही. झाली तुतारी बंद! आता रेडियोवरच्या 'ठरीव' भावात सारं काही खायला प्यायला मिळत असल्याने दोन वेळ भरपूर (म्हणजेच स्वराज्यातलं भरपूर—रेशण्ड) जेवायचं आणि आठवड्यातून एकदा रेडियोची (व एरव्ही स्वतःची—आता कशी हे ज्याचं त्यानं ठरवावं) मुखशुद्धी ऐकायची—आठवडाभर तोंड एकदम गोड (व शुद्धही)—तुम्ही ऐकता ना नेहमी? मग चेहरा असा रडवा कां? बोला—मोठ्याने बोला! मुखशुद्धीचा कार्यक्रम कधी बंद करणार असंच ना तुम्हांला विचारायचं आहे? लिहा की पत्र—ताई अन् भाऊला! लिहा लिहा—म्हणावं येवढा निर्बुद्धपणाचा, रटाळ, कंटाळवाणा व अ—कलात्मक कार्यक्रम आम्हांला नको. अरे ही काय मुखशुद्धि झाली? एखाद दुसरा रद्दी कार्यक्रम चालेल हो. पण 'मुखशुद्धी'ची पानं सडकी कुजकीच हवी हा काय अट्टाहास ! 'गारंबीचा बापू' हे केवढं चांगल नाटक—तो डॉक्टर घाणेकर—ती उषाकिरण—काय सुंदर संच होता. पण रेडियोवरची रंगावृत्ति—अरेरे—केवढी कंटाळवाणी! छेःछे!! पार निराशा करून टाकली हो. कांही कांही नाटकं त्या त्या माणसांसाठीच बर का! दाजीसाठी काकाजी, नानांसाठी हॅम्लेट, मामांसाठी नाना फडणवीस, केशवराव दात्यांसाठी मनोहर, जयंत!! दत्तारामसाठी कर्ण, भीष्म, रामशास्त्री—तसंच डॉ. काशिनाथ घाणेकरांसाठीच बापू, संभाजी! आपल्याला नाटक आवडलं. पण रेडियो नाटक? छेः! प्रतिमा पुसट झाली त्या नाटकानं! दिवाळीतली दळवी—मंत्र्यांची नाटकं मात्र आवडली हं आपल्याला. सुखी संसाराचा सर्व्हे ऐकतांना बरं वाटलं. बायकांचा 'बक्षीसा'साठी हपापलेला स्वभाव आपण पाहतोच की! ती नाटके सादरही चांगली झाली. 'साहित्य आणि समाजनिष्ठा' ही मालाही चांगली झाली. असल्या मालांची पुस्तके कां नाही काढीत हो ही आकाशवाणी? आता पु. लं. चं व्याख्यान आम्हांला 'केसरी'त रेडीमेड हाती आलं. पण बाकीच्यांच्या व्याख्यानाचं काय? ह्या पुस्तिका खपतील बघा! धंदा आणि समाजसेवा—दोन्ही साधेल. रेडियोवाले, इकडे लक्ष द्याल काय?

[ पृष्ठ ५२ वर पहा ]















# 'यशवंत' व्हा !
# 'जयवन्त' व्हा !!

**परिस्थितीची** आव्हानें स्वीकारीत स्वीकारीत आणि तिच्यावर मात करीत करीत ताठ मानेने प्रगतीची आणि प्रगतीचीच वाटचाल करीत राहणाऱ्या यशवंतराव चव्हाणांना भारताच्या राष्ट्र पुरुषाने पुन्हा एकदा विश्वासाची साद घातली आहे. संकटाशी टकरा देत देत पुढे जाण्याची पण गड जिंकण्याची जिद्द इतिहासात मावळ्या–मराठ्यांनी दाखविली होती. आज एक नवा भारत घडत असतांना ही मावळी जिद्द दिल्ली-दरबारी आवश्यक होती. दिल्लीच्या सत्तेला कैफ फार लवकर चढतो–मैफली रंगतात–'बादशाही' सुरू होते असं इतिहास सांगतो. अशावेळीं 'सावध' वृत्तीच्या लोकनेत्यांची दिल्लीत गरज आहे–गरज होती. १९६२ साली चीनने विश्वासघाताने ह्या देशाच्या पाठींत खंजीर खुपसला आणि पंडितजींसकट साऱ्यांनीं 'हिंदी–चिनी भाई भाई' म्हणून घोषणा करून जे एक चिनी मानचित्र इथे चौका चौकातून लटकावले होते ते पार विस्कटून गेले. चिंध्या उडाल्या त्याच्या. त्यावेळी नेहरू कृपेनें भारतीय राजकारणात एकदम मानकरी झालेल्या मेननना गादी सोडावी लागली. पंडितजीना 'अखंड सावधान' राखणारा 'संरक्षणमंत्री' हवा होता. महाराष्ट्राच्या दौऱ्यात, द्विभाषिक व नंतर महाराष्ट्राच्या निर्मितीनंतरच्या काळात यशवंतराव चव्हाणांचे कार्यकर्तृत्व पंडितजींनी जोखले होते. त्यांच्यातली 'डॅश' त्यांनी ओळखली होती. चव्हाण संरक्षणमंत्री झाले ! चव्हाण एका रात्रींत अखिल भारतीय नेते झाले. पण पंडितजींनी टाकलेला विश्वास सार्थ आहे हे सिद्ध व्हायचें होते. चव्हाणांनीं आपल्या तीन वर्षांच्या काळात ते सिद्ध करून दाखविले. चव्हाणांच्या वागण्यांतला 'साक्षेप'च त्यांना उपयोगी पडला. माणसांशी प्रत्यक्ष बोलणें, त्यांना बोलू देऊन ती जोखणे, त्यांची कसोटी घेणे, त्यांना फुलू देणे. विश्वासाने विश्वास वाढविणे. आणि आपण मात्र अखंड सावधानता बाळगणे हे चव्हाणांच्या वागण्यातले वैशिष्टच ! चव्हाण हे 'सावध राजकारणी' आहेत. महत्वाकांक्षी आहेत. कर्तृत्वशाली आहेत. शालीनही आहेत आणि 'नाठाळाचे माथी' काठी हाणण्याइतके कणखर मनाचेही आहेत. संरक्षण खात्यात त्यांनी जो नवा विश्वास उत्पन्न केला आहे, जी सुसूत्रता आणली आहे, जे तेज, जो पराक्रम फुलविला आहे, त्याचा प्रत्यय गतवर्षीच्या भारत-पाक लढाईत आला आहे. १९६२ ची मरगळ मेली आहे. 'सावध' संरक्षण मंत्री असल्याने सेना सावध होती. सेनानी सावध होते. म्हणूनच 'छांब-अखनूर'चा 'ऑपरेशन ग्रँडस्लॅम' फसला व भारताची शान कायम राहिली. यशवंतरावांना विरोध चांगला पचविता येतो. त्यांनी महाराष्ट्राच्या राजकारणांत कांही नव्या परंपरा–चांगल्या परंपरा रूढ केल्या. विरोधी पक्षांशी विचार-विनिमय करणे, मोर्चांचे स्वागत करणे. त्यांचे म्हणणे ऐकणे. विरोधी पक्षांच्या न्याय्य मागण्यात सूर मिसळणे. हुतात्मा स्मारकाच्या सभेला महाराष्ट्राचा त्यावेळचा मुख्यमंत्री उपस्थित राहतो–एवढेच नव्हे तर तो मोठी देणगीही देतो ही गोष्ट सर्वस्वी नवी व अनपेक्षित होती. चव्हाण होते म्हणूनच 'प्रतापगडचा मोर्चा' रक्ताचा एकही थेंब न सांडता पार पडला. ते 'कुशल' आहेत. कल्पक आहेत. जनतेच्या भावना जाणणारे आहेत. जनतेच्या लढ्यांत ते सतत वावरले आहेत. ते 'श्रीमंत' पुढारी नाहींत. त्यामुळे ते नुसते आदेश देत नाहींत–पाळतात. साहित्य–कला–इतिहास–संस्कृति–परंपरा ह्यांची त्यांना 'जाण' आहे. मागे एकदा ते 'नाट्यदर्शना'च्या कार्यक्रमाला अध्यक्ष होते. साहित्याच्या दरबारीही ते येतात. पण त्या त्या व्यासपीठांची मान उन्नत व्हावी असंच वागतात–बोलतात. रसिकतेने भोवतीचे जीवन ते पाहतात. त्यामुळेच त्यांना 'माणसे' हेरता येतात. कलाकार-साहित्यिकांनाही चव्हाण आपले वाटतात ते त्यामुळेच ! चव्हाणांची ही कमाई म्हणजे चमत्कार नाही. ती एक साधना आहे. कळत्या वयापासून यशवंतराव जनतेत आहेत. जनतेबरोबर आहेत. १९४२च्या चळवळीत ते भूमिगत होते. त्यांच्यासाठी एक हजाराचे बक्षीस सरकारने लावले होते. आजारी पत्नीला हा धाडसी पति भेटायला गेला आणि पकडला गेला. पण त्यांतूनच उजळले भाग्य, यशवंतरावांचे आणि देशाचेही ! नियतीने दिलेली आव्हाने स्वीकारणे व त्यांतून 'यशवंत' होण्यासाठी आपल्या व्यक्तित्वाची उंची वाढवीत नेणे हेच चव्हाणांच्या बाबतीत वारंवार घडले आहे. ही हिंमत त्यांच्यात दिसते आहे म्हणूनच पंतप्रधानांना त्यांचा 'भरवंसा' वाटतो आहे. त्यातून धीर मिळतो आहे. सात नोव्हेंबरच्या घटनेनंतर जेव्हा नवा








व कणखर गृहमंत्री हवा होता तेव्हा इंदिराजींनी नेमके चव्हाणांचेच नाव घेतले आणि अनेक विरोध पचवून शेवटी ते कायम राखले.

चव्हाण गृहमंत्री झाले आहेत. महाराष्ट्राचा हा 'सावध' व 'कणखर' सुपुत्र ऐन घुमाळीच्या काळात गृहमंत्री झाला आहे. भोवती सीमा अशांत आहेत. आसाम पोखरला गेला आहे. मिझो–नागा बंडखोर 'क्रियाशील' आहेत. विद्यार्थि आंदोलनातून हिंसात्मक उद्रेक घडत आहेत, दुष्काळाची छाया काही प्रांतांवर पडली आहे. निवडणुकांवर लक्ष ठेवून परिस्थिति 'स्फोटक' करण्याकडे लोकशाही-वर श्रद्धा नसलेल्या गटांची वाटचाल चालू आहे. एका मोठ्या 'वादळी' वातावरणात चव्हाण संरक्षणमंत्री झाले. वादळ शमले. निदान पराभूत तरी झालेच. आता पुन्हा तशाच 'वादळी' हवामानात चव्हाण 'गृहमंत्री' झाले आहेत. शासनाचा दरारा नाहीसा होऊ पहात आहे. चव्हाण शासनाला नवी प्रतिष्ठा मिळवून देतील असा विश्वास वाटतो. आज 'पोलादी' गृहमंत्र्याचीच गरज आहे.

—आदित्य

[ पृष्ठ ४४ वरून—नरी कॉन्ट्रॅक्टर ]

नाही. आम्हाला अर्थात् त्या गोलंदाजीचा सराव नसला तरी इतर देशाच्या विरुद्ध झालेल्या कसोटी सामन्यात आपण द्रुतगती गोलंदाजाना फोडून काढले आहेच की. वेस्ट इंडीजमध्ये आपण सामने हरलो याचे कारण कोणत्याच कसोटी सामन्यात आपला नेहमीचा संघ खेळलेला नाही. दरवेळी कुणाला तरी दुखापत झालेली असे. माझ्याप्रमाणेच मांजरेकर, पतौडी, जयसिंहा सर्वानाच दुखापती कमीजास्त झालेल्या होत्या. पॉली उम्रीगरची तर पाठ दुखत होती. मात्र आमचे क्षेत्ररक्षण चांगले झाले. आपण वेस्ट इंडीजपेक्षा जलद खेळलो."

"हे अधिक स्पष्ट कराल काय ?" मी विचारले.

ते म्हणाले, "जलदगती गोलंदाज असले की प्रतिपक्षाला लवकर बाद करता येते. त्याच्या धावाही रोखता येतात. वेस्ट इंडीजचे हॉल, ग्रिफिथ तासाला सामान्यतः चौदा षट्के टाकतात. तर आपले गोलंदाज स्थूलमानाने वीस षट्के टाकतात. षट्के आणि धावा यांचे तासी प्रमाण काढा म्हणजे कळेल मी काय म्हणतो ते."

"द्रुतगती गोलंदाज आपल्या देशात कां तयार होत नाहीत ?" मी याबाबतीत त्यांचे विचार समजावेत म्हणून त्याना प्रश्न विचारला.

"आपल्याकडे पूर्वी निसार, अमरसिंग, बॅनर्जी हे जलदगती गोलंदाज होते. मग आजच तशा प्रकारचे गोलंदाज आपल्या देशात कां होणार नाहीत ? आपण त्यासाठी काय प्रयत्न करतो ? सोळा सतरा वर्षांचे उंच, सशक्त आणि द्रुतगती गोलंदाजी करू शकतील अशा तब्येतीचे तरुण शोधून काढले पाहिजेत. त्याना गोलंदाजीचे शिक्षण आणि आर्थिक साहाय्य दिले पाहिजे. द्रुतगती गोलंदाजी करू इच्छिणाऱ्या खेळाडूला दररोज व्यायाम करायला हवा. सक्तीने दररोज किमान चार मैल धावायला हवे. हे अखंड परिश्रम करायला किती तरुण तयार होतील? शिवाय, मंदगती गोलंदाजी करून संघात जर स्थान मिळते तर उगाच हा खटाटोप करणार कोण ?"

जवळ जवळ दोन तास मी त्यांच्या सहवासात होतो. यापूर्वी आणखीही अशीच एक बैठक आमची झाली होती. आम्ही क्रिकेटची विविध दृष्टिकोनातून चर्चा केली. त्यांच्या सहवासात मला त्यांच्या व्यक्तिमत्त्वाच्या विविध पैलूंचे दर्शन घडले. त्यांचा स्वभाव हा अत्यंत सौजन्यशील आणि विनम्र आहे. क्रिकेटचा त्यांचा व्यासंग दांडगा आहे. भारतीय क्रिकेटबद्दल त्याना जाज्वल्य अभिमान आहे. कुणाबद्दल अकारण मत्सर नाही. कुणाचा हेवा नाही की कुणाबद्दल आकस नाही. ज्येष्ठ खेळाडूंबद्दल आदर आणि भारतीय क्रिकेटला जागतिक क्रिकेटच्या क्षेत्रात मानाचे स्थान मिळावे ही मनातली सुप्त इच्छा. क्रिकेटप्रमाणेच त्याना फोटोग्राफी आणि सुतारकाम यांची आवड आहे. आदर्श कप्तानाला आवश्यक असणारे बरेच गुण त्यांच्या अंगी आहेत. प्रत्येक प्रश्नाची शांतपणे, विचारपूर्वक पण आत्मविश्वासाने ते उत्तरे देत होते. अशा या गुणी खेळाडूची डोक्याला झालेल्या जबर जखमेमुळे अवघ्या अठ्ठाविसाव्या वर्षी आंतरराष्ट्रीय क्रिकेट कारकीर्द अकाली संपुष्टात यावी याचे मला मनस्वी वाईट वाटले. त्याना इंग्रजी, गुजराती, हिंदी या भाषांप्रमाणेच मराठीही चांगले येते. आमचे संभाषण मराठीतच झाले. क्वचित् एखादा शब्द किंवा वाक्य त्याना समजले नाही तर मी त्याना इंग्रजीत समजून सांगे. शेवटी त्यांचे आभार मानताना मी विचारले,

"यापुढे तुम्ही क्रिकेट खेळणार ना ?"

"केळकर, मी आंतरराष्ट्रीय क्रिकेटमधून अजून निवृत्त झालेला नाही. सध्या मी टाटा संघातून आणि गुजरात संघातून क्रिकेट खेळतो. शिवाय, मी आज पूर्ण फॉर्ममध्ये आहे. कसोटी सामन्यात खेळण्याची माझी इच्छा आहे. फार काय ज्याच्या चेंडूमुळे माझ्या डोक्याला जबरदस्त आघात झाला त्या ग्रिफिथ विरुद्धही मी खेळायला तयार आहे. मला तशी संधी कां मिळत नाही याची कारणे निवड समितीला विचारा. मला कसोटी सामन्यात खेळण्याची संधी मिळावी ही माझ्या आयुष्यातली महत्वाकांक्षा आहे. ती संधी मला मिळेल का हो ?" त्यांचे ते उद्गार अजूनही वारंवार माझ्या मनात येतात आणि मी नकळत व्यथित होतो.

● ● ●



अनुक्रमणिका






## वादळ उठले, बदल घडले!!

वटवृक्ष उन्मळून पडला. त्यानंतर माणसें जमली आम्रवृक्षाखाली. फळांनी लधलेल्या-रसांची ग्वाही देणाऱ्या! पण त्याला दृष्ट लागली. कीड लागली. तोही नव्या वर्षाच्या साक्षीने उन्मळून पडला. आता इये देशी इंदिरा गांधी नामक, भारतातील पहिल्याच स्त्री पंतप्रधानाचे राज्य चालू झाले आहे. काय योग असेल तो असो, ह्या राजवटीला सुरुवात झाली तीच मुळी मोठ्या स्फोटक परिस्थितीत. हे स्फोट कधी आसाममध्ये, तर कधी केरळ—आंध्रामध्ये, तर कधी पंजाबमध्ये— पण स्फोट व स्फोटक परिस्थिति आजही कायम आहे. अगदी राजधानी सुद्धा त्यातून सुटलेली नाही. हा असंतोष हीच आमची गेल्या सतरा वर्षातल्या प्रजासत्ताकाची कमाई आहे असे आपण मानायचे का ? विद्यापीठापासून तो जीवनावश्यक अशा वस्तूंच्या व गोष्टींच्या सर्वच क्षेत्रात हा असंतोष आज धुमसतो आहे. कधी भाषेच्या नावाने तर कधी प्रांताच्या नावाने, कधी विद्यार्थ्यांचे नाव घेऊन तर कधी गाईचे नाव घेऊन ह्या असंतोषाचे उद्रेक सतत होत आले आहेत. पंडितजी व शास्त्रीजींच्या काळात हे उद्रेक कदाचित सुप्त असतील, धुमसत असतील. इंदिराजींच्या राजवटीत मात्र पंजाबपासून आंध्रापर्यंत आणि मध्यप्रदेशापासून ते आसाम बंगालपर्यंत ते 'व्यक्त' रूप घेत आहेत. ही परिस्थिति चिंतनीय आहे. सात नोव्हेंबरला दिल्लीच्या लोकसभेसमोर 'गोहत्याबंदी'साठी जे लक्षावधींचे निदर्शन झाले व त्यातून जो हिंसेचा डोंब उसळला त्याने गृहमंत्री नंदाजींचा बळी घेतला. त्यावेळी झालेल्या पोलिसी गोळीबारात मृत झालेल्यांची संख्या आठ आहे असे सरकारी फतवे सांगत असले तरी ती काही शेकड्यात असल्याचा 'बघ्यां'चा दावा आहे. शासनाने वादातीत व संशयातीत रहायला हवे असते. पण पोलिसी अत्याचाराना पाठीशी घालण्याची शासकीय प्रवृत्ति




बळावत चालली आहे हे मोठ्या खेदाने नमूद करावेसे वाटते. गोळीबारात मेलेल्यांच्या प्रत्यक्ष आईबापांनाही त्यांचे शव न देण्याचे 'दिल्लीकरां'चे धोरण मानवतेच्या नांवाने क्षणोक्षणी गळे काढून रडणाऱ्यांना व व्हिएटनामसाठी वारंवार अमेरिकी शासनाला शिव्याशाप देणारांना भूषणावह खासच नाही. दिल्लीच्या गोळीबाराचे आकडे लपवून शासन 'शुद्ध' राहू शकत नाही. 'पुण्यशील' राहू शकत नाही. ज्यांची मुले गेली. नवरे गेले. भाऊ गेले त्यांची शापवाणी त्या 'भयगाथा' गातच राहील. गोळीबार नोटीस न देता केला गेला. 'मारण्या'च्या हेतूने केला गेला व प्रेते ताब्यात दिली नाहीत असे अनेकविध आरोप केले गेले आहेत. राजकारणात हत्या होते अखेर सामान्य माणसांची. पण सामान्य माणसाचे अस्तित्व व त्याचे मोठेपण हे शासनाने मानलेच पाहिजे. लोककल्याणकारी राज्याची प्रतिज्ञा घेणाऱ्या शासनाने तर ते मानलेच पाहिजे. बापाला मुलाचे प्रेत लोककल्याणकारी राज्यात देता येत नाही ? लक्षावधि हिंदूंच्या मतावर राज्ये चालविणारांना गोवंशाबद्दलची शतकांनुशतकांची श्रद्धा समजू शकत नाही? लक्षावधींच्या संख्येने ह्या देशाच्या अस्तित्वालाच चूड लावण्यासाठी आसाममध्ये घुसणारांना गेली आठ दहा वर्षे जे शासन 'क्षमा' देऊ शकते, अभय देऊ शकते ते शासन गोवधबंदीची मागणी मात्र 'पाशवी' प्रवृत्तीने दडपू पाहते हे फक्त इथेच घडू शकते. 'न्यायालयीन चौकशीची मागणी' नाकारून शासन संशयातीत नाही हेच जणु शासनाने मान्य केले आहे. गुन्हेगार सुटतात आणि निरपराध माणसांची हत्या पचते असेच वारंवार घडत आले आहे. गुन्हेगार मग तो कोणत्याही मत-पंथ-पक्षाचा असो, त्याला शासन व्हायलाच हवे. ह्या देशात तूर्त राजकीय गुन्हेगारी खूप वाढली आहे. तिला पायबंद घातला गेला नाही तर समाजाच्या अस्तित्वालाच धोका पोहचण्याचा संभव आहे. आज समाजातल्या कायदाप्रेमी माणसांची मने संभ्रमित झाली आहेत. ही स्थिति चिंतनीय आहे.

दिल्लीच्या वादळात नंदाची नाव तळाशी गेली. आणि तथाकथित वादळ शमल्यासारखे झाले. मंत्रिमंडळाची पुनर्रचना झाली. कणखर मनाचे यशवंतराव चव्हाण गृहमंत्री झाले, त्यांच्या निवडीचे स्वागत साऱ्यांनी केले आहे. चव्हाणांनी दिल्ली विद्यार्थि-मोर्चाबाबत घेतलेली भूमिका कांहीना 'चव्हाणांची' अशी वाटली नाहीं. "विरोधी मोर्चांना सामोरे जाणारे हेच का यशवंतराव ?" असेही काहीजण म्हणाले. पण मला स्वतःला मात्र ह्या परिस्थितीत यशवंतरावांनी घेतलेली भूमिका स्वागतार्ह वाटली. ज्यावेळी लोक कायदा हातात घेतात तेव्हा शासनाने 'राजदंड' उगारायलाच हवा असे मला वाटते. यशवंतराव कुशल आहेत. ह्यानंतरच्या काळात आम्हांला ठाऊक असलेल्या यशवंतरावांचे दर्शन आम्हांला घडेल अशी खात्री !

ह्या खातेबदलातला सर्वात स्वागतार्ह बदल वाटला नामदार छगलांचा ! परराष्ट्र खात्यासारख्या एका महत्वाच्या जागेवर एक अत्यंत सुयोग्य मंत्री येत आहे. छगलांच्या कर्तृत्वाचा, सुस्पष्ट












विचारांचा, निःस्पृह वृत्तीचा प्रत्यय ते न्यायमूर्ति असतानाही वारंवार आला आहे व युनोतल्या त्यांच्या कामगिरीच्या वेळीही आला आहे. स्वर्णसिंग आता संरक्षणमंत्री झाले आहेत. यशवंतराव व स्वर्णसिंग ह्यांची खाती तशी एक-मेकांशी संलग्न अशी आहेत. त्यामुळे दोघांचीही जबाबदारी आपापल्या परीने वाढली आहे. बलदेवसिंग नंतर प्रथमच एक शिख मंत्री संरक्षणमंत्री होत आहे. स्वर्णसिंग यशस्वी होवोत. शिक्षणखात्या-बाबत तसे म्हणता आले असते तर बरे वाटले असते. छगलांची काहीशी क्रांति-कारी कारकीर्द त्यानी पुढे चालविली तरी ठीक होईल. दुर्दैवाने आपले शिक्षण-मंत्री नेमणुकीनंतर आजारी पडले आहेत. त्याना आराम पडेल आणि त्याच्या कर्तृत्वाचा लाभ देशाला होईल अशी आशा करू या !

## साहित्य

### दिवाळी आली–दिवाळी गेली

—निर्वेधपणे पार पडली. दिवाळी अंकही वेळेवारी व प्लॅनप्रमाणे पार पडले (गत-वर्षी युद्धामुळे मूळ योजना कांहींना बदला-यला लागल्या होत्या) गतवर्षी फटा-क्यानी 'मार' खाल्ला होता. यंदा त्यांचे 'बार' चांगले भरले गेले. काहीनी गेल्या-वर्षीचीच फुसकी दारू 'वाळवून' विकली व भलताच 'पैसा' केला. मिठाईच्या पेटचा खपल्या. बऱ्या ठरल्या. (फक्त एकाच दुकानाच्या पेटचांनी 'विष' बाधा झाल्यांचा (अपवाद) अत्तरांचा सुगंध दरवळला. कापडांच्या दुकानात गर्दी होती. वेण्या रोज खपत होत्या. आकाशदिव्यांनी नवनवीन आकार घेतले होते. एकूण दिवाळी बरी आली आणि चांगली पार पडली. शासकीय (रेशनच्या) सोयीमुळे दिवाळीच्या फराळाचे एक 'सोशल फंक्शन' अलिकडे रद्दच झाले आहे. त्यामुळे कार्यालयातून 'वहावारी' दिवाळी घडली. दिवाळी अंक वाजत गाजत आले. वृत्त-पत्रानी (नेहमीप्रमाणे) अनुक्रमणिका वाचून अभिप्राय (की पोच) दिले. त्यामुळे 'कोठे काय' येवढेच कळले. 'कसे काय' हे कळले नाही. काही मासिकांनी महागाईचे कारण सांगून (खरंय् ते) किंमती वाढ-विल्या. पण अंक 'छोटे' काढून त्यांनी 'वसुली' केली. तर काही 'मोठ्या' दर्जे-दार, बादशहा वगैरे अंकानी किंमती त्याच ठेवल्या व 'तोल'ही राखला. काही नवी वार्षिके भेटीला आली तर काही मासिकांची वार्षिके झाली आणि भेटली. 'अंजली'ने आपला ठसा पुसून टाकायचा जणु संकल्पच केलेला दिसतोय्. कारण प्रा. फडके यांची कादंबरी वाचा-यसाठी उघडावी लागतो 'सह्याद्री'चा अंक ! प्रपंच' ने यंदा दोन कादंबऱ्या दिल्या आहेत. श्री. जं ज्या जोडीला वोकील ! 'चंद्रकान्त' ने सराइतपणे चार कादंबऱ्या दिल्या आहेत. शं. ना. नवरे या क्षेत्रात नव्यानेच उतरले आहेत (मेमका–सुरुंग) तर शकुंतला गोगटे, माधव कानिटकर, शैलजा राजे (ए कदम दोन-आविष्कार व रोहिणी) चि. त्र्यं. खानोलकर (प्रदीर्घ कथा–मौज) संभाजी बांदिवडेकर (वसुधा) वगैरे मंडळी-नीही कादंबऱ्या दिल्या आहेत. पु. भा. भावे यांची **दर्शन** यंदाच्या लोकसत्तेत 'पुढे चालू' झाली आहे. **रणजित देसाईनी** यंदा दोन झकास ऐतिहासिक कथा दिल्या आहेत (केसरी व किर्लोस्कर) ब. मो. पुरंदरे; गो. नी. दांडेकर ही आणखी काही मानकरी (ऐतिहासिक कथातली). गोष्टी बऱ्याच वाचल्या पण मनात 'घर' करून राहील अशी गोष्ट अजून सांपडणे आहे. मुसळधार (गोखले दीपावली) स्पर्श-भावे (दीपावली) मोहोर (ना. सं. इनामदार-वसुधा) भडकलेली समई (केसरी-विभा-वरी) उत्तररात्र (य. दि. फडके–बहुश्रुत). बदली (गोखले–) वाढदिवस (गोखले) ह्या त्यांतल्या त्यांत (वाचलेल्यात) उल्लेखनीय गोष्टी. मौजेतले लेख, केसरीतला (पुरवणी) अरविंद गजेंद्र-गडकर यांचा लेख, श्री. के. क्षीं.ची मुला-खत, त्यांचा लोकसत्तेतला लेख. विद्याधर गोखल्यांची वावनखणी (दीपावली) खरवस (वसंत सबनीस–दीपावली) यशवंतराव व स. गो. बर्वे प्रकट चिंतन (केसरी-किर्लोस्कर) हे अन्य वाचनीय ! पु. ल. दे. यंदा तसे 'स्वस्थ'च बरं का ! पण सुगंधमध्ये विगचित्रे आहेत (फक्त कल्पना) यंदा शा. शं. रेग्यांनी कथां-ऐवजी (व्यंगचित्रांना) कल्पनाच पुरविल्या. अनुराधा, ललना, माहेर ह्या माहेर-वाशिणींनी भरपूर 'मॅटर' दिले आहे. त्याचा उपयोग होईल आणि बाहेरच्या हॉलमधून ते 'प्रेक्षणीय' बघायला मिळेल अशी आशा करावी काय ? हे मॅटर व फराळाचे पदार्थ मासिकात 'बंदिस्त' राहं-तात अशी एक तक्रार नेहमी ऐकू येते. महिलांनी योग्य तो बोध घ्यावा ! 'आवाज'ने निदान व्यंगचित्रांचा (किल्ली चित्रे का काय म्हणतात ती) साचा बद-लावा असे वाटते. कारण तो Suspense आता ठराविक ठिकाणीच घोटाळतो व गंमत कमी होते – हे लोक बोलतात हो ! वसंत यंदा फार 'जड' झाला आहे म्हणतात ! 'लोकसत्ता'कारांचं यंदा अभिनंदन करायला हव बरं का ! ते 'बहुत' व 'प्रेक्षणीय' फोटो न दिल्याबद्दल! आणि दोन रुपयात भरगच्च अंक दिल्याबद्दल ! "केसरी"कारांचे सुंदर पुरवणी दिल्याबद्दल. "सत्यकथा"कारांचे दिलीप पु. चित्रे यांची "ती" धमाल व प्रदीर्घ गोष्ट छापल्याबद्दल (नाहीतर कुणा संपादकाची हिंमत होती काय ?) एकूण काय दिवाळी बरी गेली. अजून बरेचसे अंक चाळून–वाचून व्हायचेत. एक गोष्ट राहिली. **हंस-नवल-मोहिनी** चे संपादक अनंत अंतरकर ह्यांच्या अकाली मृत्यूच्या अनुषंगाने हंसमध्ये त्यांचे चिरंजीव आनन्द अंतरकर यांनी लिहिलेला **'अखेरचे स्मित'** हा लेख मला फारच हृद्य वाटला. अंतरकरांचे अंक चाळतांना त्यांच्या मृत्यूचा विचार विस-रता आला नाही.

तूर्त इतकेच !

**–सारस्वत**




अनुक्रमणिका

[पृष्ठ १० वरून—तुझं सुख ते...]

पण सकाळी आई उठली की हे सारं तिला सांगायलाच हवं असं हजारदा अलकानं मनाशी घोकलं तरी ते कसं सांगावं याचा निश्चय तिला करता येईना, तशी ती अधिकच भांबावली आणि आपल्या बिछान्यावर तळमळत राहिली....

मात्र सकाळी ती उठली तशी तिला एक युक्ति सुचली. ती लाडिकपणे आईला म्हणाली,

"आज संध्याकाळी हेमाला मी चहाला बोलावलंय्. तिच्या वडिलांची बदली नागपुरला झालीय् म्हणून ती आता कायमची तिकडे जाणार आहे..."

"मग येऊ द्या ना तिला..."

आई असं म्हणत जरा मोकळेपणानं हसली आणि तिच्याकडे निरखून पाहात म्हणाली,

"नागपूरला कां जाणार आहे ती?..."

अलका एकदम चपापली आणि अडखळत म्हणाली,

"हो...होय ना!..."

"हेमा येणार म्हणून संध्याकाळी क्लासला जाणार नाहीस ना तू आज?..."

"ना...नाही...."

"बरं, बरं, नकोस जाऊ हं!...आणि हे बघ अलका..."

"काय आई...?"

"आज हेमा येऊन गेली की एक दिवस हेमंतनासुद्धा बोलाव चहाला..."

आईच्या तोंडचे ते शब्द ऐकताच ती किंचाळल्यासारखी ओरडली..."आई!..." एका क्षणात ती आपल्या आईच्या कुशीत शिरली आणि म्हणाली,

"आई! आई!...."

"हे बघ अलका, बापूसाहेबानी मला सारं सांगितलंय्. काय वाईट आहे तू ठरवलं आहेस त्यात? बापूसाहेब सांगत होते हेमंत एम्. एस्सी. आहेत, मोठे देखणे आहेत, हुशार आहेत, त्यांच्या वडिलांची नागपूरला मोठी फॅक्टरी आहे. हे सारं मला सांगायचं कां टाळीत होतीस, मला माहित आहे. तू काही ठरवलंस तर ते मला आवडायचं नाही अशी भीति तुझ्या मनाला वाटली असेल, पण माणूस अखेर आपल्या मार्गानंच जाणार हे मला कळत का नाही? मला तुझी सोबत हवी होती. आज हवी होती, उद्या हवी होती. पण त्यासाठी मी तुला जन्माची दुःखी कशी करू? या जगात कुणी कुणाला कायमची सोबत करू शकत नाही, हे मला ठाऊक का नाही. अखेर तुझं सुख तेच माझं सुख!... म्हणून म्हणते हेमंतना एकदा घरी घेऊन ये.... कधी बोलावतेस?"

आईच्या त्या शब्दानी अलकाला आलेला हुंदका आवरला नाही. आईच्या कुशीत लपविलेलं आपलं तोंड बाहेर न काढताच ती म्हणाली,

"आई, मी खोटं बोलले हेमा संध्याकाळी चहाला येणार आहे म्हणून. मी घेऊन येणार होते हेमंतानाच!..."

"खरं सांगतेस? तरीच सकाळपासनं 'आई, हे करशील ना, आई, ते करशील ना?' असं चालवलं होतंस ते! मोठी लबाड आहेस!..."

असं म्हणत माईनी तिला अधिकच जवळ ओढलं आणि तिनंहि आईला मिठी घातली. कधी एकदा संध्याकाळ होते आणि आपण हेमंतना घेऊन येतो असं तिला झालं.

पण ती बाहेर गेली तशा माई आपल्या कॉटवर लवंडल्या. साऱ्या आयुष्याचा चित्रपट त्यांच्या डोळ्यापुढे उलगडला. आपण मनाशी ठरविलं होतं काय आणि अखेर घडणार आहे काय या विचारानं त्या सुन्न झाल्या. अलका लग्न होऊन गेली की एकाकी-पणाच्या भयाण डोहात आपण सांपडणार आहो या कल्पनेनं त्या दिङ्मुढ झाल्या. पण जे घडणार होतं त्याला कुणाचाच इलाज नव्हता हा विचार त्यांच्या मनात तरंगत राहिला. आणि त्या स्वतःशीच म्हणाल्या, 'नशिबात असेल ते काही चुकायचं नाही!' पण या विचारानंतरहि त्यांचं मन शांत झालं नाही आणि कसलं तरी शल्य त्यांच्या मनात ठुसठुसत राहिलंच...

मात्र संध्याकाळी हेमंतना घेऊन अलका घरी आली तेव्हा आपल्या मनातलं शल्य विसरून त्या मोकळेपणानं त्यांच्याशी बोलत, हसत राहिल्या. आपल्या लेकीची निवड काही अगदीच चुकली नाही असं तर त्याना वाटलंच, पण हेमंतचं लाघवी बोलणं त्याना फार आवडलं. अलका फराळाचे पदार्थ आणि चहाचा ट्रे आणण्यासाठी आत गेली तसा तो म्हणाला,

"अलकानं सारं सांगितलंय मला. माझ्या मनात तरी नागपूरला जाऊन राहायचं आहे कुठे? संशोधन करावं, पी. एच. डी. व्हावं आणि इथंच प्रोफेसर व्हावं असं मी म्हणतोय् आणि माझी खात्री आहे की माझे वडीलहि माझ्या म्हणण्याला संमति देतील. अलका तुम्हाला सोडून जाणार म्हणून तुमचा जीव वर खाली होतोय् मला माहित आहे, पण अखेर तुमचं दोघीचं सुख तेच माझंहि!..."

असं म्हणत हेमंत मोकळेपणानं हसला तसं आपण काय ऐकलं हेच माईना समजेना. त्यांच्या तोंडातनं शब्दच फुटेना, पण त्यांच्या मनातलं खिन्नतेचं मळभ क्षणात गेलं आणि प्रसन्नतेच्या प्रकाशानं आपलं सारं अंतःकरण उजळल्याचा भास त्याना क्षणात झाला. अलकानं आणून ठेवलेलं खाद्य पदार्थ 'घ्या' असं हेमंतना म्हणायचं भानदेखील त्याना राहिलं नाही!

●●●






[पृष्ठ ४६ वरून—असे पाहिले...]

# शरदबाबू-टागोर मद्रासेत

हिन्दी चित्रपट प्रेक्षणीय (नेत्राल्हादक) व श्रवणीय (श्रुति-मधुर) असतात ह्यांत वाद नाही. पण तें चांगले असतात—निदान असू शकतात ह्यावर माझा गेल्या कित्येक वर्षात विश्वास बसत नव्हता. पण परवा एक चित्रपट पाह्यला आणि शरदबाबू टागोर मद्रासेत कधी गेले बुवा असा प्रश्न पडला. नाहीतर मराठी ग्रामीण पट आणि हिन्दी कुठलाही चित्रपट ह्यांची गणिते आता ठरल्यासारखी झाली आहेत. स्टार कास्ट, गाणी, नाच, हाणामारी व खूपशी प्रियकर–प्रेयसीची (उगाचच) पळापळ घातली की चित्रपट तयार ! गाण्यांत काही चित्रपट मारतात तर काही ह्या असल्या पळापळीत! अलिकडे निरनिराळ्या बॅक ग्राऊंडवर तेच ते (म्हणजेच युनिव्हर्सल) प्रेम रंगविणारे चित्रपटही 'फॅशन' म्हणून निघताहेत. आता 'लव्ह इन टोकियो' आणि 'लव्ह इन सिमला' ह्यात फरक काय! लव्ह तेच—फक्त सिमला वेगळा आणि टोकियो वेगळा! फॉर्म्युलाही तोच! (आता प्रेमात तरी बिचारे नवीन काय दाखवणार म्हणा) नव्याने पाहिलेल्या चित्रपटाचे नाव आहे **'छोटाभाई'**! आपण खूष! म्हणा मध्ययुगीन—प्रतिगामी! पण **'छोटाभाई'**ने अलिकडच्या (अपवाद—बिमल रॉय) चित्रपटांच्या जमान्यात एक नवे पर्व सुरू केले आहे खास! कथा आहे दीर–भावजयीच्या अकृत्रिम व असामान्य प्रेमाची! अन्नपूर्णेच्या व रामूच्या रूपाने एक फार मोठ्या व खोल अशा आशयाची कथा ह्या चित्रपटाने दिली आहे. रामची आई मरतांना त्याला अन्नपूर्णेच्या हाती सोपवते. अन्नपूर्णा तिला वचन देते की, मला मुलगा झाला तरी रामू माझा पहिला मुलगा राहील. ती ते वचन पाळते. रामूच्या स्वभावांत सच्चाई आहे. म्हणून वारंवार संघर्ष घडतो. पण अन्नपूर्णा साथ देते. तिची कजाग आई आल्यानंतर मात्र रामूला जाच सुरू होतो. आई आणि पुत्र, मानलेला दीर ह्या कात्रीत अन्नपूर्णा सापडते—अखेर रामू एकाकी पडतो. पण त्याची माया असते 'भाभी'वर. भाभीचा जीव घुटमळतो 'रामू'मध्ये! अखेर 'रामू' तिच्यासाठी जीव धोक्यात घालतो. तिला वांचवतो. सत्य कळते. भावांचे मीलन होते. कृत्रिम वाटणी कोलमडते–घर पुन्हा प्रेमात न्हाते. दीर–भावजयीची ही कहाणी सुखात्म होते. अर्थातच इथे कथेत दोष नाहीत असं नाही. ह्यात भडक व एकसुरी चित्रण फार आहे. 'आई'चे चित्रण हे 'कजाग–सासू'चे एकसुरी चित्रण वाटते. चांगले आणि व्हाईट–ब्लॅक्स्, दोनच रंग! पक्के व गडद! असा माणूस तुम्हाला कुठे गवसला आहे काय? पण ह्या चित्रपटात गवसेल. 'लट्टू' पणावरचा विनोद आता 'जुना' झाला–नाही का? श्रीमंताचा मुलगा–त्याची शाळेतली मिजास, त्याची शिक्षकाने केलेली प्रशंसा वगैरे चित्रणातून रामूची व्यक्तिरेखा चांगली घडत जाते. रामूच्या मनाची विविध आंदोलने, त्याचे आंतरिक व बाह्य संघर्ष चांगले लिहिले व चित्रित केले गेले आहेत. 'हनुमान' च्या वधानंतरची वेदना फारच 'बोलकी' आहे. ह्या चित्रपटात व्यक्तिरेखा मोठ्या आहेत त्या भाभी व रामूच्या! त्यांच्या मायेचे मोठेपण शेवटी मन जिंकून जाते. पुजाऱ्याच्या प्रसादासाठी रामूने केलेला 'तूफानी' प्रवास खोटा वाटला तरी 'मोठा' आहे. श्रद्धेचा प्रभाव सांगणारा आहे. जमेची बाजू नूतन व महेश कोठारे ह्यांची! हा गुणी मुलगा अप्रतिम अभिनय करतो–त्याला स्थूलता येऊं पहात आहे. "टेक केअर" बॉय्! वुइश यू एव्हरी सक्सेस! आई वडिलांची गादी चांगली चालवली आहेस. नूतन 'मोठी' आहेच. तिला साजेसा 'रोल' मिळाला आहे. ललिता पवारचा 'ब्रँड' आता लोकांनीच निश्चित केला आहे–ती बिचारी काय करणार! रहेमान अन्नपूर्णेच्या नवऱ्याची भूमिका करतो झालं! वाव नाही! कथा चांगली–चित्रण चांगले. पण संगीत व दिग्दर्शन मात्र अगदी निराशाजनक ! लक्ष्मीकांत–प्यारेलाल यांनी हे संगीत द्यावें हे आश्चर्यजनक ! 'सूर' सरले या 'सर' जगहपर नहीं था? एक चांगला विचार मांडणारे–शरदपरंपरेतले 'मद्रासी' चित्र! मद्रासी जमाना बदलल्याचे सूचन करणारे–एवढीच कमाई! !

—बन्याबापू

[पृष्ठ ५ वरून—आमचेहि एक मत]

आणि ही ढगाची, कृष्ण मेघाची प्रेयसी बघा. मनीमवाळाला पाहून वाटावं 'हसले नभी चांदणे'. कृष्णमेघ ओथंबलेत. मयूर आनंदलेत. वृक्ष आळसावलेत. सगळं वातावरण झाकाळलं आहे. हीचि प्रीत मात्र उजळली आहे. ओलावेला प्रकाश हिच्या डोळ्यात नाचतो आहे. खरं खुरं 'वर्षानृत्य' चाललं आहे हे!

आणि ही चन्द्रिका कां लाजलीय बरं? अहो! असे संभ्रमात काय पडलात? इथ समाधी लागलीय् जरा लक्ष द्या! स्वरब्रह्मात हिची ब्रह्मानंदी टाळी लागलीय! अंतरीची अनामिक हुरहूर डोळ्यातून पाहते आहे निसर्गाचा डौल, तरीसुद्धा मन धालं नाही आहे. बासुरीवाला जवळ असून तिला ती स्वरसमाधी, ते स्वराचं सावट, मोडवत नाही. नाहीतर हा हाती आलेला क्षण! नव्हे प्रकाशाचा कवडसा! नव्हे कमलदलावरला दवबिंदू! कधी निसटून जाईल? येईल का सांगता अं!

मग चला पुढं बरं! शिशिरवसंतो पुनरायातः! असंच हे चालायचं असतं. आपण तिऱ्हाईत.

ही ग्रीष्मकन्या पहा, उन्हात व्याकुळली आहे तरी वात्सल्याच्या श्रावणधारा कोसळता आहेत हरिणांच्या शावकावर! मनोमन सुखावली आहे! तरीपण उन्हानं जाजावली आहे! वाट पहाते आहे सावळ्या घननीळाची! चला जाऊया आता.

दलालसाहेब, अंक पाहून मनाशी, हृदयाशी जे गुणगुणलं, कानी कुजबुजलं, हृदयी नाचलं आणि बोचलं, तेच लिहिलं आहे.

कथा, कविता, सारंच चांगलं! वाङमयाचं नवनीत आपण दिलं आहेत.

ही दीपोत्सवाची छळाळी। आमुच्या
मनीची पुरवी आळी।
ही मनोहारी चित्रावली। दीपावलीची'
ऐसें रूप, अलंकार। वाचकांवरी उपकार
वात्सल्यप्रितीचा देकार। करुनीं तृप्त
'दीपावली' ही!

असंच वाटलं. प्रतिवर्षी अशीच जनता-जनार्दनाची सेवा आपुल्या हातून घडो. व ईश्वर आपल्याला निरंतर कार्यरत ठेवो ही दीपावलीच्या निमित्ताने माझी शुभकामना.

सर्व अंकामधून आपले व्यक्तित्व तरळताना दिसते ही चांगली गोष्ट आहे. शेवटची 'कृतज्ञतेची शब्दुली। ही विनित कुसुमाची अंजली। ठेवूनिया चरणकमली। आपण धन्य झाला, रसिकाच्या।

**हरीपूर (सांगली)** —**अशोक परांजपे**

ता. क.—

**शर्यत!**

जीवन ही एक शर्यत आहे. सुख आणि दुःखाला कारण, असे सद्गुण आणि दुर्गुण यांची इथं शर्यत चाललेली असते. मात्र सद्गुणाला विवेकाचा लगाम खेचित असतो. आणि दुर्गुण मात्र सुसाट, बेफाम धावत असतात. जेव्हा या शर्यतीत सद्गुण विजयी होतील तीच दीपावली! खरं ना?

●●●






